पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश यांचे जन्मरहस्य उपनिषदांतून सांगितले गेले. या विश्वाची निर्मिती हा परमात्म्याचा किंवा ब्रह्माचाच आविष्कार होय. ब्रह्मरुपाने किंवा परमात्मरुपाने विश्व हे एकात्म होय. त्यांच्या मुळाशी असलेले ब्रह्मतत्त्व आणि माणसाचा जीवात्मा भिन्न नाहीत. असा विचार सर्व उपनिषदांकडून मांडला गेला. ही उपनिषदे ब्रह्मचिंतनपर किंवा आत्मचिंतनपर आहेत. भारतीय नीतिधर्माचा आणि जीवनदृष्टीचा सांगोपांग विचार उपनिषदांतून केला गेला आहे. प्राचीन ऋषींनी निसर्गसान्निध्यात तदात्म होऊन पर्जन्यसूक्ते लिहिली, उषःसूक्ते लिहिली, सूर्य सूक्ते लिहिली. त्यांच्यामध्ये मनुष्यमात्राच्या सौंदर्यविभ्रम टिपणाऱ्या वृत्तीचे दर्शन घडले. रामायण – महाभारत ही महाकाव्ये म्हणजे भारतीय जीवनसंचिताचे नवनीत होय. हे सारे वाङ्‌मयीन कर्तृत्व म्हणजे या श्रेष्ठ प्रज्ञावंतांची – प्रतिभावंतांची विजनवासात केलेली अपूर्व निर्मिती आहे. 'झपूर्झा' मनःस्थितीत गेल्याशिवाय ती होणे शक्य नव्हते.

आधुनिक जीवनातील ऐहिक सुखवर्धनाचा मूलमंत्र ज्या शास्त्रज्ञांनी जोपासला त्यांनी देखील एकान्तात राहून अहर्निश प्रयत्नांची शिकस्त केली. त्यांच्या महान प्रयोगांतून अभिनव विश्व जन्मास आले. गॅलिलिओ, हेन्री कॅव्हेंडिश, ओटीपोन गेरिक, आर्किमिडिज, आयझॅक न्यूटन व आइनस्टाइन इ. अनेक शास्त्रज्ञांचे जीवन समजून घेताना त्यांना केवढ्या मोठ्या समाजिक संघर्षाला तोंड द्यावे लागले आहे याची कल्पना येते. 'गर्दीचे वय कमी असते आणि व्यक्तीचे वय जास्त असते' या उक्तीचा प्रत्यय येथे येतो. ज्ञान–विज्ञान–तंत्रज्ञानाच्या आमूलाग्र क्रान्तीच्या उंबरठ्यावर हे जग उभे ठाकलेले असताना जीर्ण – शीर्ण रुढिग्रस्त समाजासमोर, द्रष्ट्या प्रज्ञावंतांना आणि प्रतिभावंतांना किती प्रतिकूल परिस्थितीतून जावे लागलेले आहे हे समजून घ्यायला हवे.

समाजाच्या हितासाठी झटणारी प्रज्ञावंत आणि प्रतिभावंत माणसे अशी मनस्वी असतात. कोणत्यातरी स्वप्नाने ती झपाटलेली असतात. त्यांचा ध्यास आणि श्वास अहर्निश त्यासाठीच असतो. पण समकालीन समाजमनाला हे कळत नाही हे दुर्दैवच म्हणायला पाहिजे. पण ध्येवादी माणसे अविचल निष्ठेने तुफानी वाऱ्यांना न डगमगता आपली समाधी लावून बसतात.

शेवटी अशा माणसांकडून समाजाच्या सौख्याची ललाटरेषा खुलत जाते.





# अथ रवीन्द्रोपनिषदम्

– डॉ. बाळकृष्णजी कानोळकर
असोसिएट प्रोफेसर, मराठी विभाग
गोवा विश्वविद्यालय, गोवा

सकल सन्माननीय तसेच आदरणीय श्रीयुत रवीन्द्र केळेकर यांना आज 'ज्ञानपीठ' विजेते विचारवंत व साहित्यिक म्हणून भारतीय सारस्वताच्या मांदियाळीमध्ये ओळखले जाते. 'ओथांबे' हा त्यांचा मुक्तचिंतनपर स्फूटलेखांचा संग्रह. तो सन २००० मध्ये प्रकाशित झाला. त्याचा हिंदी अनुवाद डॉ. माधवी सरदेसाई ह्यांनी केलेला असून तो 'पतझर में टूटी पत्तियाँ' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झालेला आहे. विशेष म्हणजे हा अनुवाद भारतीय ज्ञानपीठ, दिल्ली ने (२००५) प्रकाशित केलेला आहे आणि आज 'ओथांबे' ह्या मूळ कोंकणी पुस्तकाचा अनुवाद मराठीत होत असलेला पाहून मला अत्यंत आनंद होत आहे. आनंद कशासाठी तर, मूळ कोंकणी 'ओथांबे' च्या प्रकाशन सोहळ्यात मला प्रमुख वक्ता म्हणून पुस्तकासंबंधी चार शब्द बोलण्यास आमंत्रित करण्यात आलेले होते. माननीय रवीन्द्रबाबांचे वय व अधिकार पाहता मला दडपून गेल्यासारखे वाटणे साहजिकच होते. त्यांच्या उपस्थितीत त्यांच्या पुस्तकासंबंधाने बोलणे तेही प्रकाशन सोहळ्यात? आव्हानच होते... अमर्याद परंतु 'बोलणें' संपवून खाली बसलो तेव्हा टाळ्यांचा अव्याहत गजर ऐकू आला. हायसे वाटले. नंतर अनेकांनी प्रत्यक्ष भेटून भाषण आवडल्याचे सांगितले. 'ओथांबे' वरचे हे कोंकणी भाषण 'जाग' या साक्षेपी नियतकालिकामधून छापून यावे व ते सर्वांना उपलब्ध व्हावे असे मला अनेकांकडून निरोप आले. 'जाग'च्या

कार्यकारी संपादकांकडूनही विचारणा झाली. परंतु मूळातले भाषण माझ्याकडे लिखित स्वरुपात उपलब्धच नव्हते, तेव्हा या वाटण्या-असण्याला काही अर्थच नव्हता.

पुढे कधीतरी पणजी आकाशवाणी केंद्राकडून 'ओथांबे'वर कोंकणीमधून लघुभाषणासाठी आमंत्रण मिळाले. भाषण ध्वनिमुद्रित झाले. अनेकदां प्रसारितही झाले. ते लिखित स्वरुपात होते. पुढे ते 'जाग'मधून प्रकाशितही झाले. ''क्ष' समिक्षेंतलो' ह्या माझ्या (पारितोषिक विजेत्या) कोंकणी साहित्य समीक्षाविषयक ग्रंथामध्ये त्याचा समावेश करण्यात आलेला आहे.

आणि आता फिरून पुन्हा 'ओथांबे'च्या मराठी आवृत्तीकरिता मी काही लिहावे असे मला सांगण्यात आले. नाही म्हणतांच आले नाही. तर असा हा माझा आणि 'ओथांबे' या पुस्तकाचा ऋणानुबंध.

'ओथांबे' आता मराठी भाषेतून टपटपायला लागतील तेव्हा यच्चयावत मराठी प्रज्ञावंतांचे कान टवकारले गेल्याशिवाय राहणार नाहीत. त्याचप्रमाणे महाराष्ट्रदेशीच्या विवेचक विचारवंतांच्या तोंडी हे 'रवींन्द्रोपनिषद' पुढील अनंत काळापर्यंत तरी सुरक्षित राहील याची खात्री वाटते. तसे पाहू गेल्यास श्रीमान रवीन्द्र केळेकर हे नाव एक लेखक म्हणून मराठी भाषेला अपरिचित मुळीच नाही आहे. 'जपान जसा दिसला' या सारखे विलोभनीय प्रवासवर्णन त्यांनी मराठी शारदेच्या प्रांगणात रुजू केलेले आहेच. 'भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र' हा ग्रंथही मराठी अनुवादातूनच सिद्ध झालेला आहे आणि तो मराठी भाषिक आणि मराठी भाषाशास्त्रज्ञांच्या हातात अलीकडेच पडलेला आहे. शिवाय 'ज्ञाननिधीच्या सान्निध्यात' आणि 'कोंकणीचे राजकारण' अशी दोन पुस्तके त्यांनी मराठीतूनच पूर्वी लिहिलेली आहेतच. या व्यतिरिक्त गोव्यातून प्रसिद्ध होणाऱ्या 'दैनिक नवप्रभा' या वृत्तपत्राच्या रविवार पुरवणीमधून 'स्वगत' या नावाचे सदर त्यांनी १९८० ते १९९९ पर्यंत सातत्याने चालविले होते. त्यातूनही त्यांनी आपल्या विचारांना, चिंतनाला आणि निरीक्षणांना शब्दबद्ध केलेले आहे. तेही आता ग्रंथबद्ध होऊन प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

'ओथांबे' हे रवीन्द्रबाब यांचे प्रेरक चिंतनशिल्प आहे. परंतु या चिंतनशिल्पाचा प्रारंभ त्याच्याही पूर्वी लिहिलेल्या त्यांच्या कोंकणी पुस्तकापासून - 'वेळेवयल्यो घुलो' या दैनंदिनी स्वरुपाच्या लेखनापासून झालेला पहावयास मिळतो. 'वेळेवयल्यो घुलो' (१९७१) या पुस्तकातून आलेले लेखन हे केवळ 'दैनंदिनी' नव्हे. निमित्त दैनंदिनीचे. मात्र त्यातून रवीन्द्रबाबाचें समाज-संस्कृतीविषयीचे चिंतनच प्रामुख्याने शब्दबद्ध झालेले आहे. त्याचे स्वरूप अनुभव, निरीक्षण, चिंतन यांची नोंद या स्वरूपाचे असून त्यासाठी त्यांनी निबंध सदृश्य फॉर्मची निवड केलेली आहे. याच्या पुढच्या टप्प्यावर त्यांनी 'उजवाडाचे सूर' (१९७३) आळवले. पाठोपाठ १९७७ मध्ये 'सांगाती' आले. 'उजवाडाचे सूर' आणि 'सांगाती' ही दोन्ही पुस्तके कोंकणी भाषेतूनच आहेत. १९८० ते १९९९ पर्यंत त्यानी 'स्वगत' लिहिले. 'समिधा' सुनापरान्त या कोंकणी दैनिकातून १९८६ ते ८७ पर्यंत चालले. पुढे 'समिधा' पुस्तकाच्या रूपात लोकांपर्यंत पोचले. 'नदर संपादप्याची' हे 'जाग' या कोंकणी मासिकातून त्यांचे संपादकीय १९८८ पासून सुरू झाले ते ऑगस्ट २००७ पर्यंत अखंडपणे चालले.

ह्या सर्वच कोंकणी – मराठी लेखनाचे स्वरूप हे कमी अधिक फरकाने निबंधाचे आहे स्फूट आहे, कधी हा निबंध वैचारिक रूप घेतो, कधी खेळकर बनतो, कधी मिश्कील होतो, कधी ललितमधूर होऊन बरसतो तर कधी चिंतनात डुंबून जातो. हो, कधी कधी तर ते प्रबोधनाचे कोरडे आसूड ओढायलाही मागे-पुढे पहात नाहीत. परंतू या सर्वांच्या मूळाशी एकच एक जिव्हाळा, एकच एक तळमळ आणि एकच एक व्रत असलेले जाणवते, आणि ते म्हणजे 'जे जे आपणासी ठावे । ते ते इतरां शिकवावे । शहाणे करूनी सोडावे । अवघे जन ॥' १९९९ मध्ये प्रकाशित झालेले त्यांचे 'ओथांबे' म्हणजे या सगळ्याचे सार आहे, या सगळ्याचे सत्त्व आहे, या सगळ्याचा तो कळसाध्याय आहे.

'वेळेवयल्यो घुलो' ह्या पुस्तकातील लेखनही प्रथम 'वासरिका' या सदराखाली दैनिक 'राष्ट्रमत' मधून क्रमशः प्रसिद्ध झालेले होते. (२९-११-१९७० ते २१-६-१९७१) या पुस्तकाला 'दोन उतरां' म्हणून जे मनोगत लेखकाने लिहिलेले आहे त्यात ते लिहितात, 'ही दैनंदिनी लिहून माझ्या हस्ते कोंकणी साहित्याची सर्वांत चांगली सेवा घडलेली आहे.' कोंकणी साहित्याने त्याचे हे ऋण मान्य करण्यासारखे आहेच परंतु मी तर असे म्हणेन की त्यांच्या या लेखनाने त्यांच्या प्रज्ञाकोशात 'ओथांब्यां'चे बीज रुजूं घातले त्यामुळे मराठी साहित्यजगतानेच नव्हे तर अखिल भारतीय साहित्यविश्वाने त्याचे ऋणाईत होऊन राहिले पाहिजे.

'उजवाडाचे सूर' च्या 'मखलाशी' या निवेदनात ते लिहितात की, 'हे लिखाण दहा वर्षांपूर्वीचे आहे... संस्कृतीच्या क्षेत्रात वावरणाऱ्या माणसाला विकृतीचे फोफावलेले रान दया माया बाजूला सारून कापून काढावेच लागते.' ह्यातून काही घटना, काही प्रसंग, काही स्थळे, काही अनुभव तर काही द्रष्टेपणाचे लेखन आलेले आहे. खबरी (हकीगती) सांगितल्या सारखे त्यांनी त्या त्या विषयीं सांगितले आहे. त्यांच्या सांगण्याला एक विशिष्ट लय आहे. वळण निबंधाचे परंतु चलन कथेचे आहे. वास्तवात पाहू गेल्यास ही आत्मनिवेदने आहेत.

'वेळेवयल्यो घुलो' या त्यांच्या पुस्तकाला सन्माननीय डॉ. मनोहरराय संरदेसाय ह्यांनी 'घुलो कानाक लायतकूच' या शीर्षकाची प्रस्तावना लिहिलेली आहे. त्यातून ते त्यांच्या लेखनाचा पिंड शोधतात. त्याला त्यांनी रवीन्द्रधर्म म्हणून उल्लेख केलेला आहे. त्यांत त्यांनी लिहिलेले आहे की, " (रवीन्द्रबाब) उतरांत गंध आणि अर्थ शोधतात... सत्याचा शोध लावणारी चिंतने... त्यातून दैनंदिन जीवनाचे दर्शन घडो वा न घडो, मनाचे दर्शन घडते... त्याचे व्यक्तिमत्व स्पष्ट होत जाते.... रवीन्द्राचे लेखन म्हणजे एक साधनाच... दैनंदिनी लेखन म्हणजे एक प्रकारचे आत्मलेखन... आपल्याच जीवनावर आपणच केलेली एक धावती Commentary... त्याच्वा ह्या लेखनाला जीवनाची लांबी-रुंदी प्राप्त झालेली आहे."

रवीन्द्रबाब 'घुलो'च्या मनोगतात म्हणतात, 'माझा स्वभाव काहीसा चिंतनाचा. कोणतीही साधीसुधी गोष्ट कधी कधी मला गंभीर बनवून जाते आणि चिंतनाच्या गावीं कुठेतरी खोल खोल ओढून नेते.' नेमक्या शब्दात या लेखनाचे वर्म आणि धर्म सांगताना ते पुढे लिहितात की, "एकामेकाशी संबंध नसलेली ही त्रुटीत

चिंतने असली तरी देखील ती पावसातल्या पागोळेगत थेंबा – थेंबाने पडणारी आणि सतत स्रवणारी.'

'उजवाडाचे सूर' ह्या पुस्तकाचा जो ब्लर्ब आहे त्यात लिहिले आहे की, 'जीवनाच्या विस्तारात खोल खोल ओढून नेणारे लेखन. जे दिसते त्याच्या मागे असलेल्या सत्य – शिव – सुंदराची ओळख करून देणारे लेखन.' स्वतः रवीन्द्रबाबांनी ह्या लेखनाला 'Personal essays - आत्माभिव्यक्तीचे लेखन' असेच म्हटलेले आहे.

त्याचे 'सांगाती'मधील लेखनही ह्याच जातकुळीचे आहे. त्यातून जसे अनुभवकथन आलेले आहे तसेच रवीन्द्रबाबांच्या चिंतनशीलतेचे आणि विचारवैभवाचे मनोज्ञ दर्शन पानापानातून वाचकाला घडल्याविना राहत नाही. एवढी एकच गोष्ट जरी इथे नोंदविली तरी या लेखनाचे मोल सूज्ञांस अधिक सांगण्याची गरज ती काय?

रवीन्द्रबाबांच्या या 'विचारयात्रा'चा चवथा अध्याय म्हणजे त्यांचा 'ओथांबे' हा ग्रंथ. होय ग्रंथच. पुस्तकाला पाने असतात. परंतु ग्रंथाला पाने नसतातच. त्याला असतो विस्तार. असीम, अमर्याद, अनंत असते खोली. गर्द, सखोल, गहनाई! त्यांच्या आधीच्या तिन्ही अपत्यांचे सारे गुणधर्म त्यांच्या या चौथ्या सृजनात उतरलेले आहेतच. शिवाय त्याचेच, खास त्याचेच, असेही काही अधिकचे गुणविशेष या लेखनाला सचेतन व उर्जस्वल बनवितात असा अनुभव आहे.

रवीन्द्रबाबांनी या ग्रंथात (कोंकणी) 'सांगपा सारकें' म्हणून जे एक छोटेखानी पण धीट आणि नीट मनोगत दिलेले आहे ते वाचकाला 'सावधान!' करतेच शिवाय पुढील पृष्ठांतून घडणारे विश्वरूप दर्शन कसे पहावे व समजून घ्यावे याची एक दिव्य दृष्टीही देऊन जाते. मात्र ही दिव्य दृष्टी न घेईल तो करंटाच म्हणावे लागेल. कारण दोग्धा गोपाल नंदन असला म्हणून होत नाही ते दुग्ध प्राशन करणाराही अर्जुन असावाच लागतो. जगातील पौर्वात्य तसेच पाश्चात्य तत्वज्ञान परंपरांचे सारसर्वस्व त्यांच्या ह्या 'ओथांबे'मध्ये पुरेपुर भरून उरलेले आहे.

रवींद्रबाब मनोगतात लिहितात, ''जे सांगण्यासाठी दुसऱ्यांना एक पूर्ण पुस्तक लिहावे लागते, पुस्तक लिहूनही कधी कधी सांगून संपत नाही, ते आपणाला हा ओळीमध्ये सांगता आले पाहिजे, अशी इच्छा जर्मन तत्त्वज्ञ नित्शे ह्यांनी बाळगली आणि Twilight of Idols आणि Anti-Christ ह्या सारखी पुस्तके लिहिली. ही पुस्तके वाचली तेव्हा जाणवले, जे सांगण्यासाठी मला एक पूर्ण 'स्वगत' लिहावे लागते ते दहा ओळीत नको पण निदान एक दोन पानांमध्ये सारांशरुपात सांगता येते कां पाहूया. प्रसार माध्यमांच्या वृद्धीमुळे शब्दांचे मोल खूप उणे झालेले आहे. डब्यात उणे शब्द वापरून त्यांचे मोल वाढवतां येते कां ते पाहिले पाहिजे आणि मी अधूनमधून तसे लिहू लागलो.'

कोंकणी 'ओथांबे'चा ब्लर्ब कवीवर्य माधव बोरकर ह्यांनी लिहिलेला आहे. तो वाचनीय आहे. शिवाय

रवीन्द्रबाबांच्या लेखनाची अचूक नाडी परीक्षा त्यांना झाल्याचे त्यातून सूचित होते. त्यात ते लिहितात, 'ओथांबे' वाचताना डाग हेम्मरशोल्डाच्या 'markings' याद येते. मनात आलेले विचार सूक्ष्म भावना, जीवन आणि मरण ह्या विषयीचे खोल चिंतन हेम्मरशोल्ड mark करून ठेवत असे. त्याचप्रमाणे रवीन्द्रबाबांमधील चिंतक कवीच्या नजरेने ह्या जगाकडे पहातो आणि ज्या गोष्टी सामान्यपणे आमच्या नजरेला दिसत नाहीत त्या अचूक टिपतो.'

याच प्रकारांत अंतर्भाव होणारी त्यांची दोन पुस्तके 'घुस्पल्ले जानवें' (२०००) आणि 'अघळपघळ' (२००५) त्यांच्या 'ओथांबे' नंतर कोंकणीमध्ये प्रकाशित झाली. पैकी दुसऱ्या पुस्तकाच्या मनोगतात ते लिहितात, 'आयुष्यभर हे लिहिले पाहिजे, ते लिहिले पाहिजे, असे म्हणत लिहित आलो. ह्या पुस्तकामधील एकही लेख लिहिले पाहिजे म्हणून विचार करून लिहिलेला नाही.' याचाच अर्थ अशा प्रकारच्या त्यांच्या लेखनाचे दोन विभाग करता येतील. एक अभ्यासपूर्ण व नियोजित तर दुसरा मुक्त व स्वच्छंदी. पहिल्याची बैठक प्रज्ञेची आहे, तर दुसऱ्याला कवितेचे पंख लागलेले आहेत. प्रज्ञा आणि प्रतिभेचा असा विलास त्यांच्या एकूणच निबंध लेखनामधून अनुभवावयास मिळतो.

'लेखकाने स्वाध्याय केला पाहिजे. त्यात शिस्त असली पाहिजे. नियोजन पाहिजे.' हे साहित्य निर्माण प्रक्रियेविषयीचे आपले मत त्यांनी एके ठिकाणी नोंदविलेले आहे. वाचन, मनन, चिंतन, भ्रमण आणि अनुभवन ही त्यांच्या एकूणच लेखनाची पंचसूत्री म्हणून सांगता येईल. 'ओथांबे'मधील लेखन हा तर याचा वस्तुपाठच!

रवीन्द्रबाब बहुभाषिक. कोंकणी व्यक्तिरिक्त गुजराथी, मराठी व हिंदी या देशी भाषा आणि इंग्रजी व पोर्तुगीज या विदेशी भाषा त्यांना चांगल्या अवगत होत्या. सर्वप्रथम ते एक चांगले वाचक होते. जगातले उत्तमोत्तम साहित्य त्यांनी प्रसंगी मिळवून वाचून काढले होते. त्यांत वेद-उपनिषदें, जैन व बौद्ध वाङ्मय, संतवाङ्मय तसेच आधुनिक भारतीय श्रेष्ठ साहित्यकृतींच्या बरोबरीनेच विश्वसाहित्यातील टॉलस्टॉय, गोर्की, चेकोव्ह, फेर्नान्दु पेस्सोआ इत्यादी लेखकांच्या साहित्याचा समावेश होतो. भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा व लेखनाचा त्यांचा व्यासंग असल्याचे त्यांच्या लेखनातून जाणवते. त्यांत सर्वच धर्माच्या तत्त्वज्ञानाचा माणसाच्या उन्नतीसाठी व 'माणूस' म्हणून जगण्यासाठी कसा आणि किती उपयोग झालेला आहे आणि पुढेही होऊ शकतो याविषयीचे त्यांचे साधार विवेचन मर्मग्राही, नेटके व सुस्पष्ट असते. महात्मा गांधीच्या विचारांचा प्रभाव त्यांच्या लेखनावर सखोल व सर्वाधिक जाणवतो.

'ओथांबे'मधील लेखनाला रवीन्द्रबाबांनी जरी 'त्रुटित स्वरूपाचे' म्हटले असले तरी त्यांच्या या लेखनातून एक सूक्ष्म, एक अखंड सूत्र गुंफलेले मला सतत जाणवत आलेले आहे. ते म्हणजे जिवनोपनिषदाचे सूत्र. त्यामुळेच या लेखनाला उपनिषदांची सूत्रबद्धता आणि संवादीपणा स्वभावतःच प्राप्त झालेला आहे. सुकृतदर्शनी 'अणुरेणुयां थोकडा' या स्वरूपाचे वाटणारे हे 'ओथांबे' अथांग आकाशात दिगंत प्रज्ञाशिखरे

आणि अवीट गोडीची प्रतिभाशिल्पे भावविचारांच्या मयूर कुंचल्याने कोरताना दिसतात.

रवीन्द्रबाबांचे हे 'ओथांबे' लहान – मोठ्या आकाराचे लहानात लहान अडीच ओळीचा तर मोठ्यात मोठा अडीच पृष्ठांचा. परंतु दोन्हीचे वजन, दोन्ही मूल्य एकसारखे. 'जीवना'चा आकार कैसा?... तर त्याच्या 'पात्रा' ऐसा! हेच त्याचे उत्तर. परंतु पूर्णसत्य नव्हे. पूर्ण सत्य काय? पूर्ण सत्य 'जीवना'कार 'जीवन'! त्यांचे हे 'ओथांबे' वाचकाला अशा 'जीवना'ची जीवनयात्रा घडवून आणतात, अनुभवाच्या अथांग अनंत महासागरातच बुडी मारण्यास, उडी मारण्यास त्याला ते प्रेरित करतात. पाण्याने पाणी बांधून आणावयास गुरूने सांगावे तसाच हा एक अंतर्यामी अनुभूतीचा एक सर्वांगीण सर्वसाक्षी अनुभव. नीति–अनीति, चारित्र्य–चारित्र्यहीनता, सृजन, शिक्षण, भाषा व भाषावाद, मूल्य व नवमूल्यविचार कर्म व धर्मप्रवणता, ज्ञान–विज्ञान, यम–नियम, धर्म–शास्त्र, वेद–वेदांगे, बायबल, कुराण, उपनिषदे, बौद्धजैनादि तत्त्वज्ञाने, मार्क्सवाद, गांधीवाद, लोकशाही, समाजवाद–साम्यवाद, Culture and civilization, दुष्टता – सुष्टता, संत–असंत, तत्त्वज्ञान – तंत्रज्ञान, आंबेडकर – तुकाराम, पर्यावरण, लोक व लोकाचार, सूर – तुलसी – मीरा – कबीर, गांधी – टॉलस्टॉय – टागोर असे अनेकानेक अफाट, अनंत विषय. हे विषय म्हणजे एक एक ब्रह्मांडच. त्यांची एक सहज सहल, एक परिक्रमा ते वाचकाला घडवून आणतात. त्यांच्यामधील मित्र, तत्त्वज्ञानी व गुरू ह्या प्रवासात वाचकाला मागे पुढे सांभाळीत असतो.

उपनिषदांच्या परंपरेतला आणि 'लीळाचरित्रा'चे जातिकुळीतला हा ग्रंथ कोंकणी भाषिकांनाच नव्हे तर अखिल मानव समाजाला सतत साद देत राहील. असे तेज या ग्रंथात निश्चितच आहे. आम्ही अक्षराचे उपासक, सारे तेजाचेच पुजारी. तेजःसूर्याचे. तेजःज्योतीचे पुजारी. भारतीय ज्ञानपीठ सूर्याची, ज्योतीने केलेली ही तेजाची आरती.



# समुद्रमुद्रिका

## रमेश भगवंत वेळूसकरांची हिंदी काव्यमुद्रा

– डॉ. वासुदेव सावंत

कोकणी कविता समृद्ध करण्याचे ऐतिहासिक कार्य करणारे आणि साहित्य अकादमीच्या पुरस्काराने सन्मानीत झालेले कोकणी कवी माझे मित्र श्री. रमेश वेळूसकर *समुद्रमुद्रिकेच्या* रुपाने हिंदी काव्यप्रांतातही आपली नाममुद्रा उमटवू पहातात ही माझ्या दृष्टीने फार आनंदाची आणि स्वागतार्ह गोष्ट आहे. कोकणीबरोबरच हिंदी कवितेतही सहजपणे संचार करणे हे त्यांच्या बहुमुखी प्रतिभासामर्थ्याचेच लक्षण आहे. आजवरचे त्यांचे लेखन त्यांच्या बहुमुखतेची आणि अष्टपैलुत्वाची साक्ष देणारेच आहे. कवितेपासून ते बालसाहित्यापर्यंत आणि कादंबरीपासून ते अभिजात जागतिक साहित्याच्या अनुवादापर्यंत विविध साहित्यप्रकार त्यांनी सहजपणे हाताळलेले आहेत. पण कवी हीच त्यांची खरी ओळख आहे. कवी म्हणून मला जी त्यांची ओळख आहे ती एका विविधांगी, अष्टपैलू कवीची. बा. भ. बोरकरांच्या कवितेतील असीम निसर्गप्रेम आणि लयबद्धता जशी मला त्यांच्या कवितेत दिसली तसा पु. शि. रेग्यांच्या कवितेतील सृजनोत्सवही ना. धों. महानोर यांच्याप्रमाणे रानावर, मातीवर, शेतावर लळा लागलेला हा कवी आहे हे जसे जाणवले त्याप्रमाणे *साऊलगोरी*तला विमुक्त स्वच्छंदतावादही मनाला स्पर्शून गेला. त्यांच्या कवितेतील ही वैशिष्ट्ये *समुद्रमुद्रिके*तील त्यांच्या हिंदी कवितेतही सहजपणे प्रगट झालेली आहेत. खरे तर ही तशी सहज सोपी गोष्ट नाही कारण मातृभाषेतून तुम्ही स्वतःला जसे अभिव्यक्त करू शकता तसे अन्य भाषेतून व्यक्त होणे सहजसाध्य नसते. कारण प्रत्येकाची संवेदनशीलता त्याच्या मातृभाषेतून आणि विशिष्ट भू-सांस्कृतिक पर्यावरणातून तयार झालेली असते. ही संवेदनशीलता अन्य भाषेतून व्यक्त होणे अशक्य नसले तरी कठीण असते. कारण प्रत्येक भाषेचे भौगोलिक, सांस्कृतिक, साहित्यिक पर्यावरण विशिष्ट, वेगळे असते. प्रत्येक भाषेची विशिष्ट वाङ्मयीन परंपरा असते. त्या भाषेत लिहितांना लेखकाला त्या परंपरेचा, त्यातील मूल्यसंचिताचा भाग व्हावे लागते. तरच त्या भाषेत तो लेखक म्हणून आपली पाळेमुळे रोवून उभा राहू शकतो. त्यासाठी मातृभाषेसारखीच ती अन्य भाषाही लेखकाच्या

जगण्याचा भाग व्हावी लागते.

कवी वेळूसकरांनी कोकणीप्रमाणे हिंदीही आपलीशी केलेली आहे. आपले अंतरीचे गूज हिंदीतूनही ते सहजपणे शब्दबद्ध करू शकतात हे त्यांची हिंदी कविता वाचल्यावर स्पष्टपणे जाणवते. भारतासारख्या बहुभाषिक देशात एकाहून अधिक भाषेत व्यवहार करण्याची परंपरा प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. पण गेल्या काही वर्षात-भाषेनुसार राज्यांच्या स्थापनेनंतर भाषिक आणि प्रादेशिक अस्मितांना अधिक टोकदारपणा आलेला दिसतो. स्वतःचे भाषिक, प्रादेशिक, सांस्कृतिक वेगळेपण जपणे आवश्यक असले तरी आजकाल अस्मितेचे राजकारणच अधिक फोफावलेले दिसते. विविधतेत एकात्मता हे खास भारताचे वैशिष्ट्य म्हणून आपण सांगतो. यात विविधता जशी महत्वाची तशी एकात्मताही महत्त्वाची. पण बऱ्याच वेळा या गोष्टींचा विसर पडून आम्ही एकांगीपणे विचार व वर्तन करू लागतो. भारतीयत्वाला धोका आहे तो या एकांगीपणाचाच हे आज विशेषत्वाने जाणवू लागलेले आहे. अशा वेळी वेळूसकरांसारख्या कोंकणी कवीचे हिंदी काव्यलेखन त्यांच्या भारतीयत्वाची खूण म्हणूनही पहाता येते.

कवी म्हणून वेळूसकरांच्या ज्या काव्यवैशिष्ट्याचा प्रारंभी उल्लेख केला ती वैशिष्ट्ये. त्यांची विशिष्ट संवेदनशीलता *समुद्रमुद्रिकेतील* हिंदी कविता वाचतांनाही जाणवते. एक गोमंतकीय म्हणून निसर्ग हा वेळूसकरांच्या जगण्याचा, त्यांच्या अनुभवविश्वाचा एक अपरिहार्य भाग आहे. त्यांच्या कोकणी कवितेप्रमाणे हा निसर्ग त्यांच्या हिंदी कवितेतूनही बहरलेला आहे. इथल्या मातीशी, इथल्या निसर्गाशी लळा लागलेला हा कवी आहे. म्हणून *समुद्रमुद्रिकेतील* बहुतांश कविता गोव्याबाहेर राहून लिहिलेल्या असल्या तरी गोव्यातल्या असल्या तरील गोव्यातल्या मातीशी आणि निसर्गाशी असणारं कवीचं आंतरिक नातं या हिंदी कवितांनाही व्यापून राहिलेलं आहे. गोव्यातल्या निसर्गाचा मुख्य भाग म्हणजे विविध रूपांनी खळाळणारा इथला समुद्र कवीची संवेनशीलता ज्यांतून घडली त्यातला समुद्र हा महत्वाचा घटक. *समुद्रमुद्रिकेतील* अनेक कवितांतून कवीला भावलेला हा समुद्र नाना तऱ्हांनी व्यक्त झालेला आहे. हा केवळ प्रत्यक्ष वास्तवातला समुद्र नव्हेतर कवीच्या मनातील भावानुभवांचा हा उसळता समुद्र आहे. माडांच्या साथीने लहणाऱ्या गोव्याच्या समुद्रापासून ते केरळ आणि द्वारकेपर्यंतच्या समुद्राची अनेक रुपे जशी या कवितांतून व्यक्त होतात. त्याचप्रमाणे अनेकदा कवितेतील प्रतिमाविश्वही समुद्राने घडविलेले असते. म्हणून *'समुद्रमुद्रिका'* हे काव्यसंग्रहाचे नाव वैशिष्ट्यपूर्ण व अर्थपूर्ण वाटते.

कवीला भावलेला गोवा. तिथलं भू-सांस्कृतिक पर्यावरण या हिंदी कवितांतून नानापरीने व्यक्त झालेलं आहे. सागरकी लहरें, नारियलके पेड, हरी दूबकी चादरमें ढकी पहाडी, फूलांसे लदे काजूके पेड, घानका हराभरा खेत अशा निसर्गाबरोबरच गिरिजाघर, गणेशोत्सव, सांतेरीमाय ही गोव्याची धार्मिक - सांस्कृतिक प्रतीकेही काव्याशय बनून येतात. गोमंतभूमीची ही चित्रे उभी करताना कवीच्या मिताक्षरी पण चित्रमय शैलीचा वैशिष्ट्यपूर्ण प्रत्यय येतो. त्या दृष्टीने पुढील काही उदाहरणे लक्ष वेधून घेतात -

नीले आसमानके नीचे
हरी दूबकी
चादरमें ढँकी पहाडी
और उसपर
शुभ्रवस्त्रा
एक छोटासा गिराजाघर
नीले आसमानतले (क्र. ४)

फुलोंसे लदे है काजूके पेड
मदहोष खुशबूकी
तरल चादर
ओढी हुई
भरें पावोंकी
पहाडी (क्र. २)

किंवा कवीच्या मनात मुद्रित जालेल्या गोव्याचं आणि मांडवीतीरावरील पणजीचं चित्र पहा –

लहरोंके
किनारेपर झुमते हुए
नारियलके पेडोंको
सहलाता लेटा है
गहन गगनकी
गहराईयोमें
सहज विचरता
मुक्त मग्न गोवा (क्र. २३)

नील गगनके नीचे
मांडवीके किनारे
पणजी
पानीमें पाँव डाले
बैठी थी
आदिम कालकी
यादें उसकी
पानीमे भी पैठी थी (क्र. १०)

कवीमनातील गोव्याला निसर्गाशिवाय असं अस्तित्वच नाही. कवीची ही निसर्गानुभूती. कवितेतून साकारलेली ही निसर्गचित्रे विशेषतः संग्रहातील १५ आणि २१ क्रमांकाच्या कवितेतून पहाण्यासारखी आहेत. २१ क्रमांकाच्या कवितेत संध्याकाळचं समुद्रकाठावरील माडांचं घनदाट जंगल. सागरांच्या लाटांतून सतार छेडणारा धुरंधर वारा. आसमंतातील नीरव शांतता आणि दूरवरून येणारा चर्चमधला घंटारव याचे चित्रमय वर्णन येते आणि

नारियलके पेडोंके पत्तोंकी मर्मर ध्वनी
गोधूली बेलामें हकलाती हुयी
कवितासी

अशी नारळांच्या झाडांची आलेली अनुभूतीही प्रभावीपणे व्यक्त होते.

१५ क्रमांकाच्या कवितेत भाताच्या शेताचे (धानका खेत) असेच सुंदर वर्णन येते. एखाद्या नवतरुणीसारखं विमुक्तपणे सर्वत्र पसरलेलं शेत, त्याच्या बाजूचे बांध, बांधावरचे माड, शेताच्या मध्येच असणारा सुंदर तलाव, त्यात उमललेली लाल फुलं आणि सर्वत्र पसरलेलं वसुंधरीय सौंदर्य याचं कवीनं केलेलं वर्णन

वाचलं तर मराठीत गाजलेल्या बालकवींच्या 'औदुंबर' या कवितेची सहजपणे आठवण येते. वेळूसकरांच्या कवितेतील चित्रमय सौंदर्य बालकवींच्या औदुंबरपेक्षा तसूभरही कमी नाही.

रमेश भगवंत वेळूसकरांच्या एकूण काव्यानुभवातच निसर्ग असा रुजलेला आहे. निसर्गाशी झालेला कवीमनाचा संवाद कवितांतून वारंवार व्यक्त झालेला आहे. 'जेथे हिरवळ आणिक पाणी । तेथे स्फुरती मजला गाणी' असे म्हणणाऱ्या बा. भ. बोरकरांची निसर्ग ही काव्यप्रेरणा आहे. पण वेळूसकरांच्या बाबतीत निसर्ग केवळ काव्यप्रेरणाच नाही. निसर्गाशी जुळलेलं त्यांचं आंतरिक नातं त्या पलिकडचं, अधिक खोलवरचं आहे. अंधाऱ्या रात्री आकाशातील तारका त्यांच्या जाणीवेवर अक्षता होऊन बरसतात. 'पर तारिकाओंके कारण मैंने अपनीही थोडी और पहचान कर ली है' अशी स्वतःचीच वेगळी ओळख कवीला निसर्गामुळं होते. झाडोरा डंकनप्रमाणे नर्तन करणारी पिंपळपाने, नदीची उन्मत्त धारा किंवा 'समुद्रके किनारे झुमनेवाला नारियलका पेड' कवीला स्वतःच्या अस्तित्वाचाच विसर पाडतात (८). सर्व पाने गळून लालभडक फूलपाकळ्यांनी बहरलेला गुलमोहर सगळे संसारताप सहन करण्याचे धैर्य देतो. (७) कवीला दिसणारं झाड नुसतं झाड असत नाही तर माणूस आणि भूमी यांना जोडणारा तो सेतू असतो. संध्याकाळचे आकाश न्याहाळताना कवीचं मनच आकाशमय होऊन जातं (४३). पूर्वेचा वारा कवीच्या अंगांगातून सनईचे सूर छेडतो. अंगणात बरसणारा श्रावण कवीच्या तनमनाच्या अंगणातच बरसत असतो तर हेमंती किरण 'सीमाओंको मुक्त कराके असीम गीत' गात कवीला साऱ्या बंधनांच्या पलिकडे घेऊन जातात. 'बहता जा रहा हूं दूरस्थ नीलिमामें विलय होते हुए पर्वत शिखरोंमें' असं म्हणणारा हा कवी निर्झराच्या बृहदारण्यक बासरीच्या स्वरांत विलीन होऊन जातो (४४). 'प्रकृतीकी पालकीमें हो गया है मेरा कायाकल्प प्राकृत.' सगळी बाह्य आवरणे गळून पडून प्राकृतिक अवस्थेकडे नेणारा कवीचा असा कायाकल्पच निसर्गामुळे होतो. वेळूसकरांच्या कवितेतील निसर्ग असा केवळ सौंदर्यवर्णनापुरता किंवा काव्याला प्रेरणा देण्यापुरताच मर्यादित रहात नाही हे स्पष्ट होते.

केरळ, वैष्णोदेवी किंवा द्वारका अशा ठिकाणी भ्रमंती केलेल्या कवीच्या कवितेत या स्थळांच्या आणि प्रदेशांच्या कवीजाणिवेतील प्रतिमांही शब्दबद्ध होतात. पण या स्थळांचे वर्णन करताना कवीच्या दृष्टीने ते केवळ स्थलवर्णन नसते. ते निसर्गदर्शनच असते. वैष्णोदेवीला जाताना वैष्णोदेवीपेक्षा कवीला 'जबरदस्त खिंचाव था उस पहाडका. उसके उबडखाबड बदनपर खेलनेका' असं त्या पहाडाचंच आकर्षण असतं. कवीने पाहिलेली वैष्णोदेवी केवळ मंदिरातील मूर्ती नसते. आकाशासह सगळा परिसर व्यापून राहिलेल्या तिच्या भव्य रूपात कवीला आपलं अस्तित्व विलीन करावसं वाटतं. वैष्णोदेवीकडे कवी धर्मश्रद्धेच्या दृष्टीने पहात नाही. एक निसर्गरूप म्हणून, चराचरात–निसर्गात – व्यापून राहिलेली चैतन्यशक्ती म्हणूनच पहातो. कवीनं केलेलं द्वारकेचं दर्शनही असं आगळंवेगळंच आहे. द्वारिका या शीर्षकाखाली लिहिलेल्या सहा कवितांचा गुच्छ समुद्रमुद्रिकेमध्ये आहे. समुद्रकिनारी कोणे काळी श्रीकृष्णाने वसविलेली ती पुराणप्रसिद्ध द्वारका पाहून उचंबळलेल्या कवीच्या मनसमुद्राचे तरंग या कवितांतून उमटलेले आहेत. द्वारकेचा तो चांदण्या रात्रीचा समुद्र

आणि त्याला मिळणारी गोमती नदी कवीच्या तनमनाला व्यापून राहिलेले आहेत. ही द्वारका तिथला समुद्र, द्वारका वसविणारा श्रीकृष्ण, त्याची राधा, कृष्णाचं ते पिंपळपान या साऱ्या संदर्भासह कवीमनात मुद्रित झालेली आहे.

एक द्वारिका सागर तटपर
एक द्वारिका रत्नाकरके मनके अंदर
है एक एक और द्वारिका हर एक के मनके अंदर

कवीमनातील या द्वारकेत बासरीचे स्वर सतत निनादत असतात. कृष्णाच्या पायाखाली कधीकाळी खेळलेल्या तिथल्या समुद्राच्या वाळूचे मूठभर कण कवीला स्वतःजवळ जपून ठेवावेसे वाटतात. द्वारका तिथल्या समुद्र–मुद्रिकेसह अशी वेळूसकरांच्या हिंदी कवितेत प्रकट होते आणि भारतीय – संदर्भात वाचकांना अंतर्मूख करून टाकते.

निसर्ग हा वेळूसकरांच्या काव्यजाणीवेला व्यापून राहिलेला महत्त्वाचा घटक म्हणून *समुद्रमुद्रिकेतील* कवितांतून प्रकट झालेला असला तरी त्यांची कविता केवळ निसर्गाभोवतीच केंद्रित झालेली नाही. संवेदनशील वृत्तीने जीवन न्याहाळतांना जीवनानुभवाची अनेक रूपे कवीमनावर चित्रित होत असतात. कवीच्या जीवन – जाणीवेला संपन्न करीत असतात. *समुद्रमुद्रिकेतील* कवितांचे आशयविश्वही असे संपन्न व विविधांगी बनलेले आहे. ११ व्या क्रमांकाच्या कवितेत कवीने आपल्या काव्यनिर्मितीप्रक्रियेविषयी लिहिलेले आहे. आपल्या मनात कोणते अनुभव प्रतिमांकित झालेले आहेत हे सांगताना कवी लिहितो–

मैं हूँ खजाना प्रतिमाओंका ही
कहानियोंकी प्रतिमा
कविताओंकी प्रतिमा
उपन्यासोंकी प्रतिमा
चित्रोंकी प्रतिमा
गीतोंकी प्रतिमा
शिल्पोंकी प्रतिमा

चित्र – शिल्पादि कलाकृतींप्रमाणेच जीवनानुभवाच्या अशा अनेक प्रतिमा कवीमनावर उमटलेल्या आहेत. या प्रतिमांनीच आपलं अस्तित्व परीपूर्ण झालेलं आहे असं कवीला वाटतं. कवितेतून कवीच्या अस्तित्वाचाच आविष्कार होत असल्याने कवीमनातील या प्रतिमा कवितेतून शब्दरूप घेत असतात. त्यातून वेळूसकरांची हिंदी कविताही आशयसंपन्न बनलेली आहे. त्यामुळे निसर्गाप्रमाणेच प्रेमविषयक, स्त्रीविषयक अनुभव हाही *समुद्रमुद्रिकेतील* कवितांचा आणखी एक महत्त्वाचा घटक बनलेला आहे. प्रेमानुभव व्यक्त करणाऱ्या म्हणून या संग्रहातील क्र. १२, १८, ३५, ३६, ४५, ४६, ४७, ५२ अशा अनेक कवितांचा

उल्लेख करता येईल. कवीची सखी कधी 'स्वरूप तुम मेरी थकावटोंका प्राण' बनलेली असते. कधी सखीचे सुहास्य शब्द कवीचा रक्तप्रवाह आंदोलित करून कवीला हरवून टाकतात. कधी तिच्या घुंगरांची शरीरसंपन्न सरसराहट कवीला साऱ्या बंधनातून मुक्त करते. सखीच्या दर्शनाने कधी कवीला अशरीर बनविणाऱ्या असीम आनंदाची अनुभूती येते तर कधी तिच्या मातृरूपातून कवीला सर्वयामी आदिम सृजनाचा साक्षात्कार होतो. खरे तर या कवितांचा रुढार्थाने प्रेमकविता असा शिक्का मारून विचार केला पाहिजे असे नाही. तपशीलवार विचार करण्यापेक्षा या कवितांसंबंधीची माझी काही निरीक्षणे इथे नोंदवावीशी वाटतात. पूर्वीच्या कवितांतील मुक्त मनस्वी स्वच्छंदीपणा सोडून वेळूसकरांची कविता आता त्यापलिकडे जाऊन अधिकाधिक प्रगल्भतेकडे वाटचाल करू लागलेली आहे, हे या कविता वाचल्यावर जाणवते. माझ्यासारख्या मराठीच्या अभ्यासकाला ३५ क्रमांकाची कविता वाचताना मराठी कवी पु. शि. रेगे यांची आठवण येऊ शकते. पण *तनरज्योती*सारख्या वेळूसकरांच्या काव्यसंग्रहात रेगे यांच्या कवितेच्या पाऊलखुणा जेवढ्या ठळकपणे आढळतात तसे इथे घडलेले नाही. खरे तर कोकणी कवितेतील आपली काव्यसंवेदना कायम ठेवून पूर्वीपेक्षा आपली काही पृथकात्मता, वेगळेपण आणि प्रगल्भता *समुद्रमुद्रिके*तून कवी वेळूसकरांनी सिद्ध केलेलं आहे.

रोमॅंटिक प्रेरणेच्या पलिकडे जाऊन वेळूसकरांची कविता अधिकाधिक प्रगल्भतेकडे वळत असल्याचा प्रत्यय *समुद्रमुद्रिके*तील जीवनचिंतनात्मक म्हणता येतील अशा कवितांतून स्पष्टपणे येऊ शकतो. अशा कवितांची समुद्रमुद्रिकेतील संख्या लक्षणीय आहे. रोमॅंटिक दृष्टी जीवनाकडे सौंदर्यात्मक स्वप्नरम्यतेने पहाणारी असते. पण या स्वप्नाळूपणातून बाहेर पडून पाहू लागलं की जीवनाचं वास्तव थेटपणे मनाशी भिडू लागतं. पाहिलेल्या जीवनाविषयी मन अंतर्मुख होऊन चिंतन करू लागतं. *समुद्रमुद्रिके*तील कवितांतून कवी वास्तवाला भिडू लागलेला आहे. म्हणूनच या संग्रहातील हिंदी कवितेत सामाजिक आशयद्रव्य, कवीची सामजिक संवेदना आणि चिंतनशीलताही महत्त्वाची ठरलेली आहे. कवीच्या या सामाजिक संवेदनशीलतेचा प्रत्यय या संग्रहातील क्र. ३९, ४०, ४१ या कवितांतून सहजपणे येऊ शकेल. सामाजिक – राजकीय वास्तवाविषयीचं कवीचं भान त्यांच्या यापूर्वीच्या कवितांतून फारसं तीव्रतेनं प्रकटलेलं नाही. अशी सामाजिक राजकीय जाणीव हे वेळूसकरांच्या *समुद्रमुद्रिके*तील कवितेच एक वैशिष्ट्य म्हणून आवर्जून सांगावं लागले. गोमंतकात घडणारे वाहनांचे अपघात, आपल्या देशाची बिघडलेली आजची स्थिती, अमेरिकेसारख्या बलदंड राष्ट्राने सद्दामच्या इजिप्तमध्ये नरसंहार घडवून मानवतेवर केलेला बलात्कार अशा घटनांनी अस्वस्थ झालेलं कवीमन वर निर्देश केलेल्या कवितांतून दिसतं. वाचकांनाही या घटनांबद्दल विचार करायला लावतं. साहित्याकडे केवळ कलावादी भूमिकेतून पहाणाऱ्या काही वाचकांना कदाचित या कविता काव्यात्मकतेच्या दृष्टीने फारशा सखोल व सुंदर वाटणार नाहीत. पण काव्यात्मकतेविषयी अशा कृतक् कल्पना ठेवून कवीच्या संवेदनशीलतेचं नीट आकलन होणार नाही.

समकालीन वास्तवाचं कवीला असलेलं भान जसं वरीलसारख्या कवितांतून व्यक्त होतं त्याचप्रमाणे जीवनाविषयी कवीचं स्वतःचं असं वैशिष्ट्यपूर्ण चिंतनही काही कवितांतून व्यक्त होतं. या संग्रहातील अशा

चिंतनात्मक, जीवनार्थाचा शोध घेऊ पहाणाऱ्या कविता मला महत्त्वाच्या वाटतात. या कविता जीवनाविषयी कधी थेटपणे तर कधी रूपकात्मक, प्रतिकात्मक पद्धतीने भाष्य करतात. उदा. ५४ क्रमांकाच्या कवितेत व्यक्तीच्या मी (अहं) वर भाष्य करताना कवी व्यक्तीच्या अस्तित्वाविषयीच काही मूलभूत विचार मांडून जातो. ५१ क्रमांकाच्या कवितेत कवीचं जीवनभाष्य रूपकात्मक पद्धतीने व्यक्त होते. मनःशांतीच्या शोधात असलेला एक माणूस शांतीचा सागर असणाऱ्या एका साधूपुरूषाकडे जाऊन तुमच्याजवळची शांती मला द्या अशी विनंती करतो. तेव्हा तो साधूपुरूष तुझी अशांती मला दिलीस तर माझी शांती तुला देईन असं सांगतो. पण मनाची शांती किंवा अशांती अशी दुसऱ्याकडून घेता किंवा देता येत नाही हे त्या शांतीशोधक माणसाच्या लक्षात येतं. मनाची शांती किंवा अशांती शेवटी व्यक्तीच्या स्वतःच्या मानण्यावरच अवलंबून असते असा आजच्या तणावग्रस्त काळांत महत्त्वाचा ठरणारा विचार कवी इथे सहजपणे सांगून जातो. ससा आणि कासव या पारंपारिक लोककथेचं ६ क्रमांकाच्या कवितेतून कवीनं केलेलं आकलन व्यक्तीच्या कृतीची सार्थता (Authenticity) आणि निर्णयस्वातंत्र्य यावर भाष्य करणारं आहे. कवीचं हे जीवनभाष्य जाणकारांना कदाचित अस्तित्ववादी विचारांची आठवण करून देईल. बोधीवृक्षाखाली उभे राहिल्यावर कवीला आलेली अनुभूतीही वाचकांना कवीच्या चिंतनाची सखोलता जाणवून देऊन शकेल (क्र. ५) आजच्या धकाधकीच्या महानगरीय जीवनात माणसाला येणारा एकाकीपणाही काही कवितांतून आविष्कृत झालेला दिसतो. अशा कविता वाचल्या की कवी जीवनाकडे कसा गंभीरपणे वास्तववेधी आणि चिंतनात्मक दृष्टीने पहातोय आणि रोमँटिक वृत्तीतून बाहेर पडतोय हे लक्षात येते.

कवी रोमँटिक वृत्तीतून बाहेर पडल्याचे एक ठोस प्रत्यंतर म्हणजे *समुद्रमुद्रिकेतील* वृद्ध स्त्रियां (बुढिया) वर लिहिलेल्या २५, २७, २८, ३८ क्रमांकाच्या कविता. वार्धक्य प्राप्त झालेल्या स्त्रियांविषयी कविता लिहाव्या वाटणं यात कवीच्या दृष्टीचं वेगळेपण दिसतं. स्त्रीच्या वार्धक्यावस्थेचं दर्शन घडविताना कवी केवळ कारुण्याच्या किंवा सहानुकंपाच्या भावनेनं पहात नाही. अंधाऱ्या घरात राहणाऱ्या बुद्धी अम्माविषयी एकाकी कवीला आत्मीयता वाटते तर कधी 'सृजनजननी तू, सरस्वती तू, शब्दोंकी रानी तू' म्हणून तिच्या मोठेपणाचा प्रत्यय कवीला येतो. ज्या आजीचं बोट धरून तिच्या गोष्टी ऐकत बालपण घालवलं ती आजी वृद्धपणी मूक झाल्याचं दुःख कधी व्यक्त होतं. स्त्रीचं वृद्धत्व कवीमनाला जसं स्पर्श करतं त्याचप्रमाणं तारुण्याचा बहर ओसरतानाही देहविक्रयासाठी पांथस्थाची वाट पहाणारी स्त्रीही कवीला अस्वस्थ करते. या कविता पाहिल्या की वेळूसकरांची काव्यजाणीव *समुद्रमुद्रिकेतील* कवितांतून अधिकाधिक अंतर्मुख आणि प्रगल्भ होत चाललेली आहे असे दिसून येते.

*समुद्रमुद्रिकेतील* यां हिंदी कवितांचा एकंदर विचार केला तर या कवितेचं आशयविश्व कवीच्या पूर्वीच्या कवितांपेक्षा विविधांगी आणि व्यापक बनलेलं आहे. कवीची संवेदनशीलता, जीवनजाणीव अधिक परिपक्व झालेली आहे असे निश्चितपणे म्हणता येते. आपली ही जीवनजाणीव हिंदी भाषेतून व्यक्त करताना आपल्या काव्यशैलीची सहजता कवीने हरवू दिलेली नाही हे महत्त्वाचे. खरे तर वेळूसकरांच्या या हिंदी काव्यशैलीचा

तपशीलवार विचार करता येईल. पण हिंदी भाषेचं शैलीसौंदर्य, हिंदीतील काव्यसंकेत याविषयी माझ्यासारखा मराठीचा अभ्यासक अधिकारवाणीनं फारसं काही सांगू शकणार नाही. मात्र *समुद्रमुद्रिकेतील* हिंदी कवितेची शैलीदृष्ट्या काही वैशिष्ट्ये नोंदविता येतील.

मातृभाषेशिवाय अन्य भाषेतून गद्यलेखनापेक्षा काव्यलेखन करणे अधिक आव्हानात्मक असते. गद्याच्या भाषेपेक्षा काव्याची भाषा वेगळी असते हे आपण जाणतो. साहित्यातून व्यक्त होणारा मानवी अनुभव भावना, संवेदना आणि विचार या घटकांनी बनलेला असतो. पण कवितेत भावना आणि संवेदना या घटकांना गद्य साहित्यप्रकारांपेक्षा अधिक महत्त्व असते. रसरुपगंधादि संवेदनांच्या माध्यमातून एखादा अनुभव घेतांना त्याचे संवेदनात्मक रूप कवीला कसे जाणवले हे तो कवितेतून मांडण्याचा प्रयत्न करीत असतो. या संवेदनांची वाचनकाला प्रचीती यावी यासाठी भाषेचा उपयोग कवी करीत असतो. साहजिकच भाषेच्या रूढ नियमित रूपापासून कवितेची भाषा काही अंशी दूर गेलेली असते. संवेदनांची प्रचीती देण्यासाठी कवितेची भाषा उपमा, प्रतिमा, रुपके, प्रास, शब्दसंकर, नवशब्दनिर्मिती अशा भाषिक विशेषांचा अवलंब करते. कवितेची भाषा ही प्रतिमांची भाषा असते असे म्हटले जाते. ते खरे असले तरी बऱ्याच वेळा प्रतिमांचा अतिरेक काव्यानुभवाला बाधकही ठरू शकतो. या दृष्टीने समुद्रमुद्रिकेतील कवितांचा विचार केला तर कवी आपल्या संवेदना-नुभवाची प्रचीती हिंदी भाषेतूनही देण्यात यशस्वी ठरलेला असला तरी प्रतिमांचा अतिरेक टाळलेला आहे. नव्या प्रतिमांच्या द्वारे (किंवा बा. सी. मर्ढेकरांच्या भाषेत नव्या भावनानिष्ठ समतानता शोधून) कवितेत नवता आणण्याचा प्रयत्नही कवीने केलेला नाही. कवीने योजलेल्या पुढील काही उपमा-प्रतिमा किंवा शब्दप्रयोग पाहिले तर वेळूसकरांच्या हिंदी काव्यशैलीची ओळख पटू शकते.

उदा. गहन गगनकी गहराई, मुकुल मलमल, चिरंतन निरंतरता, अंतर निरंतर यासारखे प्रास किंवा बैठी थी – पैठी थी, बेला-अकेला, पुरवाई-शहनाई यासारखी यमकात्मता सहजपणे कवितेत येते आणि कवितेला लयबद्धता प्राप्त करून देते. वेळूसकरांच्या कोंकणी कवितेचं खास वैशिष्ट्य असणारी छांदस लय आणि संगीतात्मकता त्यांच्या या संग्रहातील सगळ्याच कवितेमध्ये कदाचित दिसणार नाही पण क्र. १४, १९, २४, ३६ या कविता वेळूसकरांच्या कवितेतील लयकारीच्या दृष्टीने मुद्दाम पहाण्यासारख्या आहेत. यमक, प्रास याप्रमाणेच बृहदारण्यक बाँसुरी, जादुई काजुई, समाज – समझ – सनक, कंपन शरीरसंपन्न, मुस्कान – कानन यासारखे विशेषणात्मक, रूपकात्मक शब्दप्रयोग किंवा पंसारीकी दुकानकी तरह गोमतीके किनारे पसरा हुवा साधूका असाध्य संसार, मोमसी पिघलती तारिकाएँ, सैन्यवत् खडा नारियलके पेडोंका जंगल यासारख्या उपमा नाविन्यपूर्ण वाटतात. अत्यंत अल्प शब्दांत, कमीत कमी ओळीतून एखादी कल्पना – चमत्कृती व्यक्त करणं हे वैशिष्ट्यही काही कवितांतून दाखवता येते. शैलीदृष्ट्या *समुद्रमुद्रिकेतील* अशी इतरही अनेक वैशिष्टेय सांगता येतील. पण त्या तपशीलात न जाता शेवटी मी एवढेच म्हणेन की कवी म्हणून आपलं प्रगल्भ रूप दाखवणारी कविता हिंदीतून लिहून हिंदी साहित्याच्या प्रांगणात श्री. रमेश भगवंत वेळूसकरांनी दमदार पाऊल टाकलेले आहे.

●●●

# आनंदयात्रा

## बोरकरांचा 'उभ्या भारताचा पहारेकरी'

– ग. ना. कापडी

कुठेही कुणा द्रोह अन्याय होवो
तयाचा इथे क्षोभ अन् वेदना
इथें वेचितें स्वप्न उन्मार्गगामी
नव्या संसाराची घुमे घोषणा
कणा भारताचा असा सहय येथें
कधी मेरू, मंदार, द्रोणागिरी
महाराष्ट्र माझा असा व्रजदेही
उभ्या भारताचा पहारेकरी...1



इथे रात्रिची ज्योत जागे भवानी
दिसा कष्टतों स्वेदगंगाधर
शिजे ब्रह्मनैवेद्यसें अन्न येथे
तया मंत्रितो वेद वैश्वानर
नद्या या न, या भाग्यरेषा उद्यांच्या
झरे तेज त्यांचे घरी डोंगरी
महाराष्ट्र माझा प्रतापी विरागी
उभ्या भारताचा पहारेकरी...2

इथे गर्जते मर्द भाषा मराठी
जिची अमृता झोंबती अक्षरें
रसे वेचिते सत्त्वगुह्यार्थ तारे
स्वरे छेदिते अमृताची शिरें
इथे देव भक्तास धुंडीत येतो
विटेतून येथे उठे पंढरी
महाराष्ट्र माझा असा भक्तिगाथा
उभ्या भारताचा पहारेकरी...3

इथें गाजलें धर्मसाम्राज्य पूर्वी
उभी आजला राष्ट्रधर्म ध्वजा
जगी स्थापण्या क्रांतिमूल्यें युगाची
सदा सज्ज ही सामराज्य – प्रजा
हिने खोदिली भूतकाळांत लेणी
पुढे याहुनी दिव्य कारागिरी
महाराष्ट्र माझा महास्वप्रदेश
उभ्या भारताचा पहारेकरी...4

अशी तापसी युद्ध स्वातंत्र्यभूही
शुश्चिष्मंत चारित्र्य येथे पिके
कधीही कधीही कृतांतापुढेही
तृणालाही माया न येथे झुके
जयां स्वप्न हें मोहि ते सर्व कारे
करा धन्य येथें कुडी वैखरी
महाराष्ट्र माझा तसा आपुलाही
उभ्या भारताचा पहारेकरी...5

– बा. भ. बोरकर

पुणे मुंबई येथे दीर्घकाळ वास्तव्य केलेल्या श्री. बा. भ. बोरकरांची ही कविता. शक्ती व वैचारिक खड्ग हातात घेऊन नव्या युगात क्रांतिमुल्ये स्थापण्यासाठी उभा असलेल्या महाराष्ट्राला बोरकर ‘उभ्या भारताचा

पहारेकरी म्हणून मानाचा मुजरा करतात.

मुलतः बा. भ. बोरकर हे मराठी कवी. सुरुवातीच्या काळात त्यांच्या 'तेथे कर माझे जुळती', 'जीवन त्यांना कळले हो' अशा कवितांनी बोरकरांची ओळख मराठी सारस्वताना झाली. तशा पूर्वीही त्यांनी काही कोकणी काव्यरचना केली होती. त्यावेळच्या गोव्यातील जुलमी राजवटीविरोधी एका मग्रूर अधिकाऱ्याविरुद्ध केलेली त्यांची पुढील कविता जनसामान्यांच्या तोंडी बसली होती.

'दोतोर बोश दोतोर बोश समुजुकायेन काय।
तकली तुका ना जाल्यार उठून चलू लाग।
दोतोर बोश दोतोर बोश समजुकायेन वाग
चिंतून पळय जायत किदे आयल्यार आमका राग।

गोवा स्वातंत्र्यचळवळीतील ही त्यांची प्रचारात्मक कोकणी काव्यरचना. त्यावेळी त्यांची

'गर्जा जयजयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार
त्रिवार मंगल वार आजला त्रिवार मंगलवार
स्वातंत्र्याची सिंहगर्जना आज इथे उठणार'

हे क्रांतिगीत सर्वामुखी झाले होते.

बोरकर मराठी कवी का कोकणी कवी हा वाद आता घालण्यात काही अर्थ नाही. त्याविषयी बोरकरांचेच बोल आठवणे शहाणपणाचे ठरेल. एकदा बोरकर त्यांचे चाहते कविवर्य इंजिनियर हिरालाल कामत यांच्याकडे आले होते. मीही तेथे होतो. बोरकरांनी त्यावेळी चाललेल्या (अजूनही धुमसत असलेल्या) मराठी-कोकणी वादासंबंधी एका फ्रेंच कवीची गोष्ट सांगितली होती. त्या कवीचे नांव आठवत नाही. पण त्यावेळी आपल्या मराठी, कोकणी सारख्याच फ्रेंच भाषेत एक साहित्यिक वाद दोन्ही पक्ष मोठ्या अहमहमिकेन चघळत होते! बिचाऱ्या त्या फ्रेंच कवीने खरे तर या वादावर सुवर्णमध्य गांठला होता. पण 'अ' पक्ष त्यांना 'ब' पक्षाचा मानित होते व 'ब' बक्ष त्यांना 'अ' पक्षाचा मानित होता. माझीही स्थिती मराठी-कोकणी वादावर त्या कवीसारखी आहे. मी कोकणी भाषा मानतो व कविता करतो म्हणून मराठीवादी माझ्यावर रागावलेले तर मी मराठी कविता करतो म्हणून कोकणीवादी माझ्यावर रागवलेले. शेवटी फ्रेंच भाषेतील तो साहित्यिक वाद इतका पराकोटीला पोहोचला की जेव्हां तो कवी स्वर्गवासी झाला त्यावेळी दोन्ही पक्षातील लोक त्याना 'परका' समजून त्यांच्या अंत्ययात्रेसही गेले नाहीत! ही बोरकरांनी सांगितलेली गोष्ट. त्यांनी प्रथम मराठी कविता केल्या होत्या व त्यामुळे त्यांचे नांव झाले होते. मराठी - कोकणी वाद नंतरचा. पण कोकणीचीही क्षमता पाहून बोरकरांनी कोकणीचा आग्रह धरून शब्दांचे सौदागर असलेल्या बोरकरांना कोकणीची श्रीमंतीही कळली हे पुढे त्यांच्या 'पांयजणां' या कवितेतून जाणवते.

त्या दिसा वडाकडेन गडद तिनसनां
मंद मंद वाजत आयलि तुजी गो पांयजणां...

मराठी सारस्वताताही 'पांयजणां'चे कौतुक झाले.

वसंत बापट, मंगेश पाडगांवकरांसारख्या मराठीतील दिग्गज कविवर्यानी बोरकरांची 'पायंजणा' डोक्यावर घेतली. मराठी-कोकणी वादातली कटूता मात्र पराकोटीला पावली व त्यातूनच काही विरोधकांकडून बोरकरांच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवडीला खोड घातला गेला! बोरकरांच्या अध्यक्ष होण्याने अध्यक्षपदाचा मान वाढला असता! बोरकरांच्या बाबतीत इतकी पराकोटीची कटूता बाळगणे हे चुकीचे होते. इतकी सेवा बोरकरांनी मराठी सारस्वताची केली होती. त्यांच्या मराठी कविता मराठी शारदेच्या गळ्यातील मौलिक कंठाभरणे ठरल्या आहेत. त्या अक्षय आहेत. त्यांच्या रचना काळाच्या परिसीमा ओलांडून चिरंजीवी ठरल्या आहेत. बोरकरांच्या मराठी सेवेची जाण असलेला संवेदनक्षण रसिक बोरकरांवर झालेल्या क्रूर अन्यायाची सल नेहमीच बाळगतो. बोरकर गेल्यावर हा सल जास्तच जाणवला व सदोदित जाणवत राहील. अलिकडे श्री. आनंद यादव यांच्यावर झालेली कठोर कारवाई व बोरकरांचे अध्यक्षपद हुकणे या घटनेत साम्य आहे. सुदैवाने श्री. आनंद यादव आपल्यात हयात आहेत. त्यांच्याबाबतीतली चूक पुढे मागे भरून काढता येईल. सर्वानुमते मानाने यादवाना अध्यक्षपदावर बसवता येईल. श्री. बोरकर त्या पलिकडे गेले आहेत!

शेवटी बोरकरांनी देह ठेवला तो पुण्यनगरीतच. त्यांना पुणे हे फार भावले होते. त्यांची प्रस्तुत, 'उभ्या भारताचा पहारेकरी' ही कविता त्यांनी पुणे मुक्कामात लिहिली होती. ह्या घटनेशी साम्य असलेली एक घटना आठवते. ती लिहिण्याचा मोहही होतो. कर्नाटकाचे श्री. द. के. बेंद्रे हे तत्त्वज्ञ होते, कवी होते, चांगले वक्ते होते, मराठी व कानडी भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. कॉलेजमध्ये तत्त्वज्ञानाचे ते प्राध्यापक होते. पुण्यात त्यांचे बरीच वर्षे वास्तव्य होते. त्यानीही महाराष्ट्राला उद्देशून 'साष्टांग नमस्कार, महाराष्ट्राला' ही कविता केली आहे.

बोरकरांच्या या कवितेतून एकूणच बोरकरांचे देशप्रेम, महाराष्ट्र प्रेम व आपल्या थोर संस्कृतीचे प्रेम दिसून येते. सर्वत्र भक्त देवाच्या शोधात बाहेर पडतात. महाराष्ट्राच्या बाबतीत आई-बापाना भगवंत मानून त्यांच्या सेवेत गढलेल्या पुंडलिकाच्या भेटीस भगवंत स्वतः आले! आईवडिलांच्या सेवेत असलेल्या पुंडलिकाने भगवंतान थांबायला सांगितले व उभे राहण्यासाठी देवांच्या दिशेने वीट फेकली! त्या वीटेवर उभे राहून कर कटेवर ठेवून ते परब्रह्म पुंडलिकाची वाट पहात राहिले. अजूनही असंख्य भक्तांच्या वाटेवर लक्ष ठेवून उभे आहे. त्या वीटेतून पंढरी साकारली म्हणून बोरकर म्हणतात -

इथे देव भक्तास धुंडीत येतो।

विटेतून येथे उभी पंढरी

ज्ञानोबाच्या मराठी प्रेमाविषयी ते लिहितात

इथे गर्जते मर्द भाषा मराठी
जिची अमृता झोंबती अक्षरे
रसे वंचिते सत्त्वगुह्यार्थ तारे
सरे छेदिते अमृताची शिरें

महाराष्ट्राची संवेदनशीलता व अन्यायाविरुद्ध उभे राहण्याच्या सहजवृत्तीबद्दल ते लिहितात.

कुठे ही कुणा द्रोह अन्याय होतो,
तयाचा इथे क्षोभ अन् वेदना
इथे वेधिते स्वप्न अुन्मार्गगामी
नव्या संगराची घुमे घोषणा
कणा भारताचा असा सह्य येथे
कधी मेरू, मंदार, द्रोणागिरी
महाराष्ट्र माझा असा वज्रदेही
उभ्या भारताचा पहारेकरी

महाराष्ट्राची आध्यात्मिक भक्ती बरोबर येथे असलेल्या गरीबीची, घाम गाळून सोने पिकविणाऱ्या शेतकऱ्याचेही महत्व ते जाणतात. म्हणून ते म्हणतात.

इथे रात्रिची ज्योत जाये भवानी
दिसा कष्टतो स्वेदगंगाधर
शिजे ब्रह्मनैवेद्य से अन्न येथे
तया मंत्रितो वेदवैश्वानर

महाराष्ट्राची भाग्यरेषा म्हणून कोयना नदीवरील विद्यूत प्रकल्पाची चर्चा त्यावेळी गाजत होती. त्याविषयी ते लिहातात.

नद्या या न, या भाग्यरेषा उद्यांच्या
झरे तेज त्यांचे घरी डोंगरी

प्रताप व वैराग्य यांची जवळीक साधलेल्या महाराष्ट्राविषयी ते लिहितात.

महाराष्ट्र माझा प्रतापी विरागी
उभ्या भारताचा पहारेकरी

'गर्जा महाराष्ट्र माझा, गर्जा महाराष्ट्र माझा', 'बहु असोत सुंदर, संपन्न की महा, प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा' 'राकट देश कणखर देशा, दगडांच्या देशा' अशी महाराष्ट्र स्तवने पुष्कळ आहेत. त्यांत बोरकरांची 'उभ्या भारताचा पहारेकरी' ही कविता उठून दिसते. यातील पुंडलिकाच्या भेटीस देवाने येणे व पुंडलिकाने फेकलेल्या विटेवर देवाने करकटीवर ठेवून आजही येणाऱ्या भक्तांची वाट पाहणे व त्यातून पंढरीची निर्मिती हा विचार अपूर्व असा आहे.

माय मराठीवर महाराष्ट्रास प्रेम करायला लावणारी ही कविता आहे. आजही अखंड भारताचे स्वप्न पाहणारी वेडी माणसे या देशांत आहेत. बोरकरांची 'उभ्या भारताचा पहारेकरी' वाचल्यावर किंचित् गायल्यावर कधी काळी गोवा-महाराष्ट्राचे मीलन व्हावे असे माझ्यासारख्या वेड्याला वाटते!

कवितेतील शेवटच्या दोन ओळी तर बोरकरांच्या महाराष्ट्रप्रेमाचा उच्चांक गाठतात!

जया स्वप्न हें मोहि ते सर्व यारे । करा धन्य येथे कुडी वैखरी
महाराष्ट्र माझा तसा आपुलाही। उभ्या भारताचा पहारेकरी





# बिच्चारा !



**सुमेधा कामत देसाई**
करंजाळे-तिसवाडी

मी शाळेतून घरी आले. दप्तर टेबलावर फेकून दिले. बूट कोपऱ्यात भिरकावले. कपडे तर मी घराच्या पायऱ्या चढतानाच अर्धेअधिक काढलेले. या वस्तूला, त्या खुर्चीला आपटत, इकडे - तिकडे पडत - झडत मी न्हाणी घरात पोचले. हातापायांवर पाणी ओतल्याचे नाटक करीत, आईच्या पदराला तोंड पुशीत मी जोरात ओरडले, 'ए, आई, जेवायला वाढ.' आईने निमूटपणे जेवायला वाढले. माझ्या तोंडाची टकळी चालूच होती. मध्येच माझे लक्ष रामू जिथे जेवायचा त्या जागेकडे गेले. रामू नव्हता तिथे. 'आई, रामू कुठाय?' माझा तारसूर. आई ओरडली, 'निमूट जेव बघू. रामू गेला मस्णात.' आईच्या तोंडून अपशब्द कधी निघत नाही. तेव्हा तिचं आज जामच बिनसलंय. अर्थात नेहमीप्रमाणे रामूल्यानं कसली तरी मोठी भानगड करून ठेवली असणार हे मला कळले. मी मान खाली घालून निमूट जेवू लागले. जेवणे उरकल्यानंतर आईने सावकाशीने मला सांगितले 'रामूल्याने आमचे घर सोडले.' रामूल्या आमचे घर सोडेल याची मला कल्पनाच नव्हती. आईला त्याहून मोठा धक्का मला द्यायचा होता. ती म्हणाली, 'शेजारच्या देसायांकडे त्याने आजपासून नोकरी धरलीये.' हा धक्का प्रचंडच होता. मी अक्षरशः अवाक् झाले.

आजच्या या नव्या बदललेल्या जगात काहीही घडू शकत होतं...

*****

आषाढ धुवाँधार कोसळणारा. दूरवरच्या शेतानी अद्याप हिरवी शाल न पांघरलेली. समोरचा माळ नी मागचा डोंगर अजून उघडाबोडका भासणारा. धूम धूम कोसळणारा पाऊस. थंडीने आणि ओलीने चराचर काकडून गेलेले गोठ्यातली गुरेसुद्धा पाठीची कमान करून बसलेली. त्यांना वाळलेली वैरण चघळण्यात रस नव्हता, आणि अजून त्यांना कोवळे अंकूर खायला मिळाले नव्हते. म्हणून त्यांनी आपणहून उपासमार ओढवून घेतली होती.

एक ढगाळ दिवस उजाडला. पावसाची रिपरिप चालूच होती. कुंद वातावरण. आणि दारात एक मनुष्य उभा राहिला. माणसासारखी आकृती होती म्हणून माणूस म्हणायचे एवढेच! बाकी त्याच्यात आणि पावसाळ्यातल्या उपाशी गुरात कोणताही फरक नव्हता. काळ्या वर्णाचा पन्नाशीतला तो इसम. उपासमारीने पाठ आणि पोट एक झालेले. डोळे खोल गेलेले. सकाळपासून पायी प्रवास करून दुपारपर्यंत येथे पोचल्याने भुकेने नी थकल्याने त्याच्या शरीरात त्राण नव्हते. पायात उभे राहायचे देखील बळ शिल्लक राहिले नव्हते. तो खाली उकिडवाच बसला.

आम्ही पोरे घाबरून त्या ध्यानाकडे पहात राहिलो. मला येथले खाऊन पिऊन माजलेले नि डोळ्यात गुर्मीची जाक असलेले कामकरी गावडे बघायची सवय झालेली. त्या चित्राशी हे चित्र विसंगत होते. कुठच्या दुष्काळग्रस्त उपासमारीचे हे साक्षात भूत आले होते? आईने घाबरून त्याला विचारले, 'कोण रे तू?'

'मियां रामू, रामुलो.'

आईच्या डोक्यात प्रकाश पडला नाही. आईने प्रतिप्रश्न केला, 'खंयच्यान आयला रे तूं?'

'मियाँ मांद्यांसून इलंय. ही बग भाऊन तुका चिटी धाडल्या माजे वांगडा,' म्हणत त्यानं आईच्या हातात चिठ्ठी दिली. संभ्रमित होऊन त्याने दिलेली चुरगाळलेली चिठ्ठी घेऊन ती अक्षरे वाचू लागली. काही आठवू लागली.

'अग हा आपला रामू. रामुला. देऊळवाड्यावरचा. त्याची परिस्थिती बरीच खालावलेली आहे. शेतातले काम करायचीही शक्ती अंगात नाही. अक्षरशः उपासमार चालू आहे. महणून तुझ्याकडे पाठवून देत आहे. तुझ्या घरात काही काम करील नी पोटभर खाईल. तू त्याची कसलीही चिंता करू नकोस. फक्त तिन्हीत्रिकाळ पोटभर खायला वाढ नि सगळी कामं करून घे.' चिठ्ठी संपली. चिठ्ठी आजोळहून भाऊमामाने पाठवलेली. आईने चिठ्ठी वाचून संपवली नी गुंता उलगडला.

आईला खरेदेखील वाटेना. आपला शाळासोबती इतका दीन होऊन आपल्या दारात बसेल म्हणून. आई आठवू लागली... देऊळवाड्याजवळचा कुंभारांचा मोठा वाडा. जुन्या काळात कुंभारांना चलती होती आणि चतुर्थीला गणपतीच्या मूर्ती व मातीची चित्रे बनवण्याचा जोडधंदा होता. प्रत्येक घराला पोटापुरती शेती होती. गोरे-गोमटे, बुटके कुंभार मन लावून भांडी घडवताना दिसत. नी त्यांच्या देखण्या बायका मुंगीसारख्या तुरूतुरू पळत नवऱ्याला मदत करत. त्यातल्याच एका खात्यापित्या घरातला रामू. माझ्या आईच्या वयाचा. तो शाळेत आईबरोबर शिकायला होता म्हणून आईचा शाळा सोबती. गावातल्या एक-दोन सारस्वतांच्या

घरातली मुले, इतर मग मराठ्यांची, सोनारांची, कुंभारांची, सुतारांची, लोहारांची, कुळवाड्यांची मुले शाळेत शिकायला येत. आईच्या मनमोकळ्या स्वभावाने तिची सगळ्यांकडे गट्टी जमलेली होती. रामू मोठा झाला शिक्षण कधीचे सुटलेले. बापाला धंद्यात मदत करू लागला. एक सुरेखशी मुलगी पाहून बापाने त्याचे लग्न लावून दिले. अनेक वर्षे उलटली. रामूला मूलबाळ काही झाले नाही. बायको चिडाचिड करायची. गरीब भाबडा रामू, मान खाली घालून भांडी घडवायचा. शेतांत काम करायचा. फावल्या वेळेत स्वतःची गुरं चारायचा. कुंभाराच्या नशिबी दुर्दैव हात धुवून लागलेले असते. ओल्या मातीत अखंड वावरून, घुसमटलेल्या कोंदट वातावरणात राहून नी बरेच वेळा अपुऱ्या अन्नामुळे ते क्षयरोगाची शिकार होतात. रामूही त्या रोगाला बळी पडला.

आधुनिक काळाचे वारे खेड्यात वाहात होतो. प्रत्येकांच्या चुलीवर पितळेची, स्टेनलेसची भांडी चढली. मातीच्या भांड्यांना कोणी विचारेनासा झाला. शेतीतही पीक येईना. मूलबाळ नसल्याने पुढच्या जीवनातही उमेद वाटत नव्हती. दोघाही नवराबायकोंचे दिवस उदास मनःस्थितीत जाऊ लागले. रामूच्या रोगावर इलाज करायला पैसा नव्हता. क्षयरोग्याला तर पौष्टिक अन्नाची गरज असते तीही भागेना. घरातले दागिने, भांडी मोडीत निघाली. शेतीकडे पुरेसे लक्ष देता येईना म्हणून तीही कसायला भाईबंदांना दिली. त्या मोबदल्यात ते जे काही दाणागोटा देतील त्यावर ते अशक्त दुबळे जोडपे दिवस रेटू लागले. गोठ्यातली गुरेही नाहीशी झाली. यात भर म्हणून रामूची बायकोही वारली. रामू एकटा पडला. उदास मनःस्थितीत तो दिवस घालवू लागला. दरम्यानच्या काळात त्याचा रोग बरा झाला होता. पण थकलेल्या शरीराने काम झेपत नव्हते. आणि तो एक दिवस गावच्या मोठ्या जमीनदाराकडे काम मागायला गेला. तोच भाऊमामा. त्याची कणव येऊन त्याने रामूचे पार्सल सरळ आमच्याकडे पाठवून दिले.

*****

सूर्य डोक्यावर आला तरी रामू अंथरुणावरून उठत नसे. लोळत पडलेला असे. कुंभार ही तशी कष्टकरी जात नव्हे. आरामात उठायचे पोटभर पेज जेवायची आणि तब्येतीत माती आणायला रानात जायचे. घरी येऊन उकड्या तांदळाचे शीत नी बांगड्याच्या कढीने पोटभर ओरपायचे. दुपारी ताणून द्यायचे. उठायचे नी सावकाशीने पायाने माती तुडवून घ्यायची. संध्याकाळी स्वच्छ आंघोळ करून देवळात तबला, मृदंग वाजवायला जायचे नी पहाट होईपर्यंत भजने म्हणत बसायचे. कधी वार्षिक उत्सवातून नाटकातली कामे. मग तर रोजच्या कामांना आठ – आठ दिवस बुट्टी. आरामात भांडी घडवायची नी एकदा आवा संपूर्ण तयार करून त्याने भांडी रचून आवा पेटवला की आवा निवेपर्यंत हे कुंभार गावभर हुंदडायला मोकळे. गावच्या कुंभारांचे स्वच्छंदी, निर्मळ जीवन होते. त्याला एकटा रामू तेवढा अपवाद कसा असेल?

रामू उठेपर्यंत आम्ही अंगात शाळेचा युनिफॉर्म चढवलेला असायचा. आई त्याला म्हणायची, 'अरे तू येथे काम करायला आलायस की झोपायला? उठ, मुले शाळेतसुद्धा गेली. 'रामू हेलपाडत झेलपाडत उठायचा नी विहिरीवर जायचा. राखुंडी घेऊन, मन लावून तासंतास वेळ घालवत तो दात घासायचा. विहिरीच्या पाच–पन्नास कळशा काढून तोंड धुवायचा. आई त्याच्या समोर चहाचा पेला आदळायची. रामू चहा पिऊन लक्ष्मी

म्हशीला सोडून डोंगराच्या दिशेने हाकलायचा. लक्ष्मी लहान चणीची, पण धारदार, टोकेरी, मोठ्या शिंगाची म्हैस होती. रामू तिच्या गळ्यातल्या दाव्याची गाठ सोडताना घाबरून म्हणायचा, 'भय्यांयाच्या म्हाका शींग तोपतली' लक्ष्मी म्हैस गुणी आई तिची गोष्ट सांगायची. एकदा ती चौखूर उधळत आली आणि स्वयंपाक घराच्या दारातून मी रांगत रांगत मागच्या पडवीत बाहेर जात होते. डोंगरावरून म्हैस आली, माझ्या अंगावर तिचे पाय पडून माझा चेंदामेंदा होणार इतक्यात आई ओरडली : लक्षे, थांब. माझ्या शरीरात नि तिच्या खुरात आता एका केसाचे अंतर राहिले होते. लक्ष्मी तिकडच्या तिकडेच थांबली शेपटी उडवत, अंग फुरफुरवत नी तोंडाने जोराने फुत्कारा सोडीत लक्ष्मी स्थिर राहिली. आईने मला उचलून पोटाशी धरले आणि मग लक्ष्मीला घालवले. गरीब स्वभावाची लक्ष्मी मी पाच – सहा वर्षांची असतानाच पेला घेऊन तिची धार काढायला बसायची. कोणी धार काढतंय, आपल्याला किती चेमटतंय याकडे तिने कधी लक्षच दिले नाही. मान वर करून डोंगराच्या दिशेने स्थिर दृष्टीने पहात रहायची आणि हा नतद्रष्ट तिला रोजच फुल्या–फुल्यातल्या शिव्या द्यायचा. लक्ष्मी चढावाच्या दिशेने पळत गेली की रामू भजने म्हणत गोठा झाडायचा. तसा रामू डोक्याने अंशभर कमीच होता. कोकणीत अशा लोकांना 'अर्वळ' म्हणतात. अर्वळ म्हणजे वेडा नव्हे. साधा, भाबडा, जीवनातले छक्केपंजे माहीत नसलेला माणूस. म्हणजे अर्वळ. तसा हा रामू थोडासा अर्वळच होता. गोठा झाडून झाला की तो मग घर झाडायला घ्यायचा. तोपर्यंत अकरा वाजायचे. तोपर्यंत आईची आंघोळ नी पूजा उरकायची. आईने त्याला आपल्याबरोबर चहा नी फराळाचे देऊ केले तर म्हणायचा, ''बाय म्हाका नको तसली. म्हाका तूं आपली पोट भरून पेजूच वाढ.' घरच्या शेतीचे तांदूळ यायचे. आई रामूसाठी तपेलीभर पेज टाकायची. उकड्या तांदळाची सरसरीत पेज नि तोंडी लावायला पापड किंवा आमली. रामू पेज जेवून परत नव्या कामाला सज्ज व्हायचा. मग तो आईला स्वयंपाकघरात मदत करू लागे. तांदूळ, भाज्या निवडून देणे, नाल्ल सोलणे, फोडणे इत्यादी कामे तो करी. तोपर्यंत म्हैस उतारावरून खाली यायची. तिला पाणी पाजायचे नी गोठ्यात बांधायचे. दुपारी बारा वाजायच्या आधीच त्याची आईमागे भुणभुण सुरू होई. 'बाय गो, बेगीनां जेवाण कर, म्हाका भूक लागल्या.' आई म्हणायची, 'मेल्या, मुलं तरी येऊ दे शाळेतून, मग वाढते तुला.' शिजणाऱ्या स्वयंपाकाचा गंध घेत रामू ओटीवर स्तब्ध बसून राहात असे. त्यावेळी चोरसुद्धा तिकडून गेला असता तरी रामूला त्याची चाहूल लागली नसती. तसा रामूचा उपयोग शून्यच होता. तिन्ही त्रिकाळ पोटभर जेवण नी टिवल्याबावल्यांचे काम. आमच्यासारख्या मध्यमवर्गीय कुटुंबाला तो परवडणारा नव्हता. पण त्याला माहेरून पाठवलेय म्हणून आईने त्याला निमूटपणे स्वीकारला. आम्ही सहा माणसे जेवायची, त्याच्या दुप्पट तो जेवायचा. त्याच्यासाठी कुत्र्यासाठी, मांजरासाठी आई उकड्या तांदळाचे एक भलेथोरले तपेलेच शिजवी. त्याच्यासमोर ठेवी नी म्हणे, 'जेव पोटभर.' रामू तन्मयतेने भात उकरत बसे. भात नी हुमण, भात नी हुमण. तंद्री लागल्यासारखा ओरपत बसे. किती जन्मांचा उपाशी होता कुणास माहीत!

तो कसा जेवतो हे मी त्याच्या पानाकडे ताटकळत बसत बघत राही.

रामू संध्याकाळी दुकानावर जायचा. आई त्याला एखादी वस्तू आणायला सांगायची. तर तो दुसरेच काही घेऊन यायचा. कधी दुकानावर पिशव्याच घेऊन जायचा तर कधी फक्त पैसेच घेऊन जायचा. मग पिशव्या

न्यायला घरी हेलपाटा. कधी त्याला आईने काय आणायला सांगितलेय तेच आठवायचे नाही. मग परत हेलपाटा. मग आई त्याला चिठ्ठी लिहून द्यायची. मग तो पैसे, पिशवी किंवा चिठ्ठी असा जामानिमा करून ऐटीत जायचा आणी वाटेत त्यातली एखादी तरी वस्तू हरवायचा. एकदा आईने त्याला जेवल्याजेवल्या दळायला पाठवलेले. दुपारची खमंग झोप आईने फुकटात घालवली म्हणून रामू तणतणत धान्याचा डबा घेऊन दळायला गेला. चहाची वेळ उलटली तरी रामू परत आला नाही. संध्याकाळ उलटली तरी तो आला नाही. मुलांची रात्रीची जेवणे उरकली तरी रामू आला नाही. आईला चिंता वाटू लागली. मुलांना घरी एकटे सोडून ती तरी रामूला शोधायला चक्कीवर कशी जाऊ शकली असती? रात्री भाऊ घरी परतल्यावर त्याचा शोध घ्यायचा, असे तिने ठरवले. रामू डबा टाकून गावी पळून गेला असावा (वास्तविक तो पळून जावा असेच तिला मनोमन वाटायचे) असे तिला वाटलेले. रात्री रामू नी भाऊ बरोबरच घराच्या पायऱ्या चढले. आई त्याच्यावर कडाडली, 'कुठे तडमडला होता एवढा वेळ?' भाऊंना यातले काहीच माहीत नव्हते. भाऊ म्हणाले, 'चक्की बंद करून रामू नी दुकानदार दोघे बरोबरच बाहेर आले. मी घरी येताना वाटेतच त्याला भेटलो. आणि दोघे घरी बरोबरच आलो.' रामू म्हणाला, 'चक्कीवर ही भली रांग होती.' आईला ही सबबच वाटली. दुपारी तीन वाजता चक्कीवर गेलेला रामू रात्री दहाला कसा येईल?

रामू त्या दिवशी आपली झोपमोड झाल्याने मनातल्या मनात आईवर चिडलेला. बहुतेक त्याने आधी डबा चक्कीवर ठेऊन तीन ते पाच चक्कीतच झोप काढली असावी. मग तो तेथून चार-पाच मैल चालतच मडगावच्या बाजारात गेला असावा. अर्वळ वाटणारा रामू आता बराच शहाणा झाला होता. त्याच्या अंगावरचे काजूच्या बोंडूचे, केळ्यांचे डाग पडलेले मळकट कपडे जाऊन तेथे भाऊंचे जुनेच पण झुळझुळीत कपडे आले होते. भेगा पडलेल्या, चिराळलेल्या मळकट पायात वहाणा चढळ्या होत्या. डोक्याला तेल आले होते. रामूने आता कात टाकली होती. आता तो आईकडून विडीकाडीला पैसेही मागून घेऊ लागला होता.

तो आज बाजारात गेला असावा. नी मांद्याच्या इतर गवंड्या-सुतारांकडे बोलत बसला असावा आणि बोलण्याच्या नादात आपण कशासाठी आलो होतो हेच विसरला असावा. आठवण झाली तेव्हा अंधार झालेला असावा. रामूने रात्री नऊ वाजता धान्य दळायला दिले असावे. नशिब पिठाचा डबा तरी वाचला होता.

*****

एकदा तर त्याने धमालच केली. आईने त्याला सांगितले, 'लक्ष्मीचे लक्षण कालपासून ठीक नाही. कुठे तरी पळून गेली तर आपण अडचणीत येऊ. तेव्हा घरी आण बघू तिला. 'रामू तासाभराने घामाघूम होऊन घरी परत आला. म्हशीला गोठ्यात बांधले. नेहमीप्रमाणे तिला तिच्या लांब शिंगांना शिव्या देत, तणतणत घरात आला. आंईने विचारले : अरे, म्हैस तर झऱ्यावर होती. तिला आणायला तुला एवढा वेळ का लागला? रामूने आधी एक झणझणीत शिवी हासडली नी म्हणाला : मीयाँ तिका आणूंक गेलो तर धांवांक लागली. मीयाँ फाटसून धावतंय तर ती फुडं पळतंय. ती धांवधांव धांवली. पार खालच्या वाड्यार गेली. मीयाँ तिका परतून हाडूंचे प्रयत्न केलो. कशीच आयकना नाय जाली. मगे तिचेर भरपूर धपके घातल आनी हाणत हाणत

घराकडे घेवन इलंय. XXX न माजो येळ फुकाटचो खालो. घरा येवच्या येवन XXX गोठ्यान येयनासली. दायान बांदूक दिना जाली. मीयाँ आनखी दोन रट्टे घातले आनी बांदली.

आईला वाटले लक्ष्मी माजावर आल्याने तिचे डोके फिरलेय. बिचाऱ्या रामूला तिने आज बराच त्रास दिला असावा. तरी रामूने तिला बडव बडव बडवले म्हणून आईला त्या गरीब म्हशीची दया आली. म्हणून तिला कुरवाळण्यासाठी आई गोठ्यात जाणार... तर काय तिथे लक्ष्मी नव्हतीच. आमच्या गोठ्यात दावणीला लक्ष्मी नव्हतीच, चक्क कुणी तरी दुसरीच म्हैस तिथे होती. आईने प्रेमाने पुढे केलेला हात आईने घाबरून क्षणार्धात मागे घेतला... म्हणजे रामूने दुसऱ्या कुणाची म्हैस आणून दावणीला जखडली होती. त्या म्हशीचे तरी काय चुकले होते? कुणी तरी परकी इसम आपल्याजवळ आला म्हणून बिचारी पळाली. हा इसम पाठीमागे लागला म्हणून बिचारी जीव घेऊन पळाली. थेट आपल्या घरी वगैरे गेली असावी. तेथून या आचरटाने तिला बडवून बडवून आख्खा डोंगर चढायला लावून थेट गोठ्यात आणून दाव्यात अडकवून टाकले होते. गरीब बिचारी म्हैस मार खा खा खाऊन दयनीय तोंड करून दुसऱ्यांच्या गोठ्यात उभी होती. 'राम्या धन्य तुझी!' आईने म्हटले. रामूने दावे सोडून तिला मोकळे केले. म्हैस दाणदाण उड्या मारत पळून गेली.

'म्हाका काय ठावुक. म्हाका ती आमचीच म्हस कशी दिसली.'' एवढेच सांगून रामूने या घटनेचा समारोप केला.

*****

रामूला आई आम्हाला प्राथमिक शाळेत पोचवायला पाठवायची. माझे चार-पाच किलो वजनाचे दप्तर हातात घेऊन. तो माझ्यासोबत चालायचा. माझे दप्तर तो चक्क आपल्या पाठीला अडकवायचा. त्यामुळे मला तो भलाथोरला शाळकरी मुलगाच वाटायचा. त्याला पाहून मला जाम हसू लोटायचे. पण रामूला ना खेद ना खंत. पाठीवर दप्तर लटकवून एका हातात पाण्याची बाटली तर दुसऱ्या हाताने मला घट्ट पकडून तो शाळेत यायचा. मी मराठी माध्यमाच्या शाळेत शिकायची. आमच्या घरात स्वधर्म, स्वभाषा, स्वसंस्कृती यांचे प्रस्थ. त्यामुळे माझी रवानगी अर्थात्च मराठी माध्यमाच्या शाळेत झाली. माझ्या वर्गात एक-दोन सारस्वतांची मुले वगळता इतर सर्व गरीब कुळवाड्यांची मुले होती. त्यांना माझे दप्तर घेऊन कुणी बाप्या येतोय ही गोष्टच आश्चर्याची वाटे. ती मला विचारायची, 'तुला तुझे दप्तर घेता येत नाही का?' त्यांना काय उत्तर द्यावे हे मला समजत नसे. पावसाळ्याच्या दिवसात मला 'चेडूं' पोचवायला जायचे तेव्हा शाळेत गेल्यावर माझे पाय नॅपकिनने पुसायला तिला आई सांगे. त्या मुलांना चेडूं माझे पाय पुसते ते पाहून आश्चर्य वाटे.

रामू अशा प्रकारे आमच्याकडे बरीच वर्षे राहिला. आईलाही त्याच्या कामांची सवय झाली. दारची म्हैस नी घरची मुले ही दोन प्रमुख कामे तो सांभाळायचा. घर झाडायचा, स्वयंपाकात मदत करायचा. नि दुकानावरून धान्य आणून द्यायचा. आईला त्याची मदत व्हायची. रामूच्या आधी आणि नंतर आमच्याकडे 'चेडवां' होती. 'चेडवां' म्हणजे येथल्या नोकराण्या. उच्चवर्णीयांच्या घरात प्रामुख्याने गरीब कुळवाडी लोक आपल्या लहान मुली घरकामासाठी आणून ठेवतात. या मुली घरकामात मदत करणे, मुलांना सांभाळणे

इत्यादी कामे करतात. धुण्याभांड्याला स्वतंत्र बाई असते. या चेडवांना मालकिणीने कपडे, चपला व इतर वस्तु द्यायच्या. महिन्याला पगार. चतुर्थी/शिमग्यात आठ-पंधरा दिवसांसाठी या मुली घरी जातात. साधारणपणे मुलगी दहा-बारा वर्षांची झाली की या मुलींना बामणांच्या घरी चाकरीला ठेवले जाते. त्यामुळे एका मुलीच्या चरितार्थाचा प्रश्न सुटतो. बामणाच्या घरी मुलीला पोटभर जेवण, झुळझुळीत कपडे मिळतात. चांगले रीती-रिवाज शिकायला मिळतात, अडीअडचणीला आईवडिलांना मोठी रक्कम मिळते. मुलींचा महिन्याचा पगार साठवून घरमालकिणीच विशी-बाविशीत या मुलींची लग्ने त्यांच्याच जातीतल्या मुलांकडे लावून देत. पुढे लग्न झाल्यानंतरही या मुली या घराकडे स्नेहसंबंध ठेवतात. असे हे सारे.

*****

आमच्या घराच्या आजूबाजूला वेगाने बदल घडत होते. देसाई आडनावाचे एक श्रीमंत कुटुंब बाजूच्या बंगल्यात राहायला आले. त्यांच्याकडे देखील एक म्हैस होती. तिला सांभाळण्यासाठी एक दांडगट गडी त्यांच्याकडे होता. म्हशी चारताना त्या दांडगटाची नी आमच्या अर्वळाची मैत्री जमली. दोघेही माळावर बसून तासंतास गप्पा करू लागले. गप्पांच्या नादात रामूला घरची कामे करायला वेळ मिळेना. आई चिडू लागली. वास्तविक आमच्या म्हशीला तासंतास माळावर घेऊन बसायची गरज नव्हती. गोठ्यातून सुटली की ती डोंगरावर जाई नी परत घरी येईल. मधल्या वेळात आईला रामूची स्वयंपाकात मदत होईल. केवळ एक म्हशीला सांभाळण्यासाठी रामूला ठेवणे आम्हाला कठीण जात होते. त्याची दया येऊन आई त्याला महिन्याला चांगला पगार देत असे. रामू तो आईकडेच ठेवायला देई नी चतुर्थीला घरी जाताना मागून घेई. गौरीगणपती आले की तो उल्हासाने फुलून येईल. नवे कोरे कपडे अंगात घालून तो इतर गवंड्यांच्या सोबतीने शॉर्टकटने मांद्रेला जाई. मडगावहून मांद्रे बसच्या वाटेने ८५ किलोमीटर होते. शॉर्टकटने अंतर कमी पडे असे ते सांगत. गाडीभाड्याचे पैसे वाचविण्यासाठी ते तसे करत. पाच दिवसांच्या गणपतीचे विसर्जन झाले की रामू परत हजर. देसायांच्या दांडगटाबरोबर रामू देसायांकडेही जाई. दरम्यानच्या काळात देसाई कुटुंबाकडेही त्याची घसट वाढलेली. घरचा धंदा होता. चारपाच तरुण मुलगे, सुना, नातवंडे असा व्याप. त्यांच्या भपकेबाज, श्रीमंत वातावरणाची रामूला हळूहळू भूल पडू लागली. रामू त्यांच्याकडे तासंतास वेळ काढत बसे. एक दिवस देसायांचा जाच असह्य होऊन त्यांचा दांडगट पळून गेला आणि देसायांची वक्रदृष्टी आमच्या अर्वळावर पडली. त्यांच्या म्हशीसाठी त्यांना कुणी तरी गडी हवाच होता. आमच्यापेक्षा दुप्पट पगाराची लालूच दाखवून त्यांनी त्याला आमच्याकडून पळवले. एके सकाळी सामानाचे गुठडे बांधून तो सरळ देसायांकडे नांदायला गेला. आम्ही अवाक् होऊन त्याला पहातच राहिलो. केले काय नी झाले काय असे आम्हाला झाले. आमच्या शेजारीच राहून रामूने आमचे नाक कापले होते.

*****

आणखी महिन्याभरात गौरी-गणपती आले. रामू चतुर्थीला घरी गेला. चतुर्थीपर्यंत शेते चांगली तरारलेली असतात. बांधावरचे हिरवे गवत खाऊन नि पावसाळ्यातला मोकळा वारा पिऊन गुरे मस्तवाल झालेली असतात. पुढे पीक निघते नवा कडबा खाऊन गुरे मस्तीला येतात, माजावर येतात, गायी गाभण होतात.

चतुर्थीत गावी गेलेला रामू रस्त्यावर उभा होता. गायींच्या मागे धावणारा एक बांगर बैल मध्येच त्याला काय वाटले कुणास माहीत ! त्याला वाटले रामू आपल्याला रोखण्यासाठी रस्त्यात उभा राहिला आहे. त्याने रागाने एक मुसंडी मारली आणि रामूला धडक दिली. त्या मस्तवाल, तगड्या बैलाच्या धडकीने फाटका रामू अगदी भुईसपाट झाला. बैलाने आपली टोकदार शिंगे रामूच्या पोटात त्वेषाने खुपसली. रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या. बैल माघारी वळला नी हुंकारत, खुबाटत दूर निघून गेला.

हॉस्पिटलात पोचण्यापूर्वीच रामूची प्राणज्योत मालवली.

माणसाच्या भविष्यात काय घडणारे ते कधीकधी त्याला आधीच कळते म्हणे! लक्ष्मीची टोकदार शिंगे पाहून रामूने धसकाच घेतलेला! सारखा म्हणायचा, 'भैयांराच्या, माज्या पोटांत सिंगां खुपासताली.'' लक्ष्मीला तो विनाकारण शिविगाळ करतो असे वाटून आम्हाला त्याचा संताप यायचा. पण रामू आमच्याकडे असेपर्यंत लक्ष्मीने कधी त्याला साधा ओरखडासुद्धा काढला नाही आणि आम्ही सुटलो.

गरीब बिचारा रामू! देसाई कुटुंबाकडे तो जेमतेम महिनाभरच टिकला आणि भयंकर अपघाती मरणाने मेला.

*****

आम्ही रामूला विचारायचो : अरे तू पैशांचे काय करतोस? तर म्हणायचा, भावाला, भावजयीला, पुतण्यांना कपडे नी खाऊ घेऊन जातो. भावाच्या संसारात त्याने आपले सुख शोधले होते.

पुढच्या काळात म्हणजे आत्ता आत्ताशी त्याचा पुतण्या रंगारी झाला. एकदा आमचे घर रंगवायचे होते. मामाने चिठ्ठी देऊन त्याला पाठवले. त्यात मामाने लिहिले होते, हा रामूचा पुतण्या. खाली मान घालून दारात उभे असलेले ते वाळके, लुकडे पोर, त्याची आम्हाला खूपच दया आली. कुठलीही घासाघीस न करता त्याला घर रंगवायला सांगितले. मान खाली घालून त्या तरुण पोराने आख्खे घर सुरेख रंगवले. त्याला त्याची मजूरी किती झाली म्हणून विचारले तीही तो सांगेना. शेवटी बाजारभावाने त्याला मजूरी दिली. उत्साही चेहरा करून तो निघून गेला. रामू काका आमच्याकडे नोकरी करून त्यांच्यासाठी कपडे शिवायचा या गोष्टीची त्याला कृतज्ञता वाटत असे.

मडगावी कामानिमित्त आला की तो येथे टेकतो. अगदी लाजत लाजत चहा पिईल. काही काम आहे का ते विचारील. कधी मोटारीला खालून पॅण्ट करायचे काम असते, कधी गॅरेजचे दार तर कधी ग्रील्स तर कधी न्हाणीघर. त्याला नेहमी काम मिळतेच असेही नाही. तरी तो नम्र चेहऱ्याचा तरुण घरी कधी कधी येतो नी रामूच्या आठवणी निघतात.

●●●

# पुरुष

– मीलन तळावलीकर

लिनेतची नजर खिडकीतून दिसणाऱ्या वाऱ्यावार डुलणाऱ्या नारळीच्या झाडाकडे गेली. कल्पवृक्षावर चढलेली गोकर्णीची वेल. त्या वेलीवर फुललेली पांढरीशुभ्र फुले. वेलीची पाने, फुले वाऱ्यावर डुलत, सूर्यप्रकाश पीत, फुलपाखरांशी गुजगोष्टी करत होती. ते दृश्य पाहून आनंदित होण्याऐवजी लिनेतच्या काळजात कळ उठली. आधारासाठी वेल माडावर विसंबून होती. वृक्षाच्याच आधाराने तिने आपली संसारवेल फुलवली होती. मुकूलच्या आधाराने, साथी मोबतीने आपली संसारावले फुलवायची स्वप्ने लिनेतने पाहिली होती, एखाद्या सामान्य मुलीसारखी. आधार बाल्यावस्थेत पित्याचा, तारुण्यात भाऊ आणि नवऱ्याचा आणि वृद्धावस्थेत मुलाचा.

पाठीला पाठ लावून आलेला निकोला. त्याला मांडीवर, कडेवर घेतलेले, तिचे बोट धरून त्याने टाकलेलं पहिलं पाऊल, लपाछपी खेळणारा, फुलांवर उडणारी फुलपाखरं धरू पाहणारी त्याची इवलाली बोटं – निकोलाची, बालपणीची विविध रूपं तिच्या डोळ्यांसमोरून निमिषार्धात सरकली.

होता तिचा भाऊ शीघ्रकोपी, आपले तेच खरे करू पाहणारा. पण नंतर आपलं चुकलं म्हणून चुटपुटणारा. माफी केली असती अगदी मनापासून तरी गेलेली माणसं परत येतात का? आपलं जीवन उध्वस्त झालेलं असतं. पुढे कसलाच मार्ग दिसत नाही. अंधारच अंधार. रागावून त्याने अबोला धरला असता, भांडला – तंटला असता तर त्याला चार गोष्टी समजावून सांगता आल्या असत्या. घरातील मुलगी यथायोग्य वयात लग्न होऊन सासरी जायची ही जगरीतच. पण आपली बहीण कुणावर तरी फिदा झालीय, आपली तिच्यावरील पकड आता ढिली होतेय म्हटल्यावर – मुद्दे संपले की माणूस गुद्यांवर येतो, तसा परस्पर संवादाने मार्ग काढण्याऐवजी काटाच काढला. अगदी टोकाची भूमिका.

घडली गोष्ट कथन केली तर निकोला गजाआज जाणार होता. मुकूल तिचं सर्वस्व. पुन्हा भेटणार होता

का तिला? मुकुलशिवाय अन्य कोणाला तिच्या जीवनात स्थान नव्हतं. नशिबाचेच खेळ म्हणत भोगायचं. घरातल्या माणसांच्या नात्याची वीण अगदी विसविशीत होऊन आता ती पूर्णपणे उसवली होती.

विचारांच्या आवर्तात आपले डोके अगदी भणभणून गेल्याचे लिनेतला जाणवले. ती खुर्चीत तशीच पडून राहिली. मन कधी निर्विचार असतं का? हे नाहीतर ते विचार मनात सारखे येत राहतात.

ती महिला पोलिस काहीतरी बडबडत होती. 'सामाजिक बांधिलकी', गुन्हेगारांना धाक, गप्प बसल्यानं या पुरूषांचं आयतंच फावतं, एक पचला की दुसरा करायला मोकळे.' होतं खरं असं. पण या भावना, हा व्यवहार, ही सामाजिक बांधिलकी. यातलं काय खरं? काय खोटं? शेवटी समाज म्हणजे कोण? आपणच ना? समाजानेच बदलत्या काळाचा हवाला देऊन निकोलाला समजवायचं काम करायला नको होतं का? समजवायचं सोडून आगीत तेल ओतायचं काम केलं त्याने. पुन्हा एकदा लिनेत विचारांच्या गर्तेत गेली. अगदी अलिकडचा भूतकाळ लिनेतच्या डोळ्यांसमोर एखाद्या चलतचित्रासारखा तिला दिसू लागला.

*****

लिनेत सकाळी चर्चमध्ये गेली होती. घरी आल्या-आल्या पायातले उंच टाचांचे बूट काढून तिने ते स्टँडवर ठेवले. आपल्या खोलीत शिरली. गळ्यातला नाजूक अमेरिकन डायमंडचा नेकलेस कपाटातल्या पेटीत व्यवस्थित ठेवला. बांगड्या प्लास्टिकच्या छोट्या डबीत ठेवल्या. फ्रॉक हँगरवर टाकून हँगर खोलीतल्या आडव्या टांगलेल्या दांडीवर लटकवला. अंगांत गाऊन घातला. ती स्वयंपाकघरात आली.

'आलीस? ये. चहा घे. आत्ताच केलाय. गरम आहे. दूध घालू की कोराच घेणार.'

उत्तरादाखल काहीच न बोलता लिनेतने कोऱ्या चहाचा कप उचलला आणि ती बैठकीच्या खोलीत आली. आरामखुर्चीत अलगद बसली. चहाचा आस्वाद घेऊ लागली.

लिनेत मुळची गोरीपान. पण सतत उन्हात राबल्यामुळे तिची अंगकांती करपली होती. नाकी डोळी नीटस, तरतरीत. शारीरिक कष्ट रोजचेच. त्यामुळे ती हाडापेराने मजबूत बनली होती. अलिकडच्या मुलींचे डायटिंगचे फॅड तिला आवडत नव्हते. भरपूर कष्ट करावे, यथेच्छ खावे आणि मस्त मजा करावी अशा मताची लिनेत. उंचीचा वारसा आईकडून घेतलेला. वडिलांकडून काळेभोर कुरळे केस. शिल्पकाराने दगडात कोरलेले एक शिल्पच जणू!

लिनेतच्या मनात काय चाललेय ते आईला माहित का नव्हते? पण घाईघाईने गोष्टी केल्या की कधी-कधी नातेसंबंध सुधारण्याऐवजी बिघडण्याचाच संभव अधिक असतो. म्हणून ती अगदी संथ गतीने वाटचाल करीत होती. आई बैठकीच्या खोलीत येऊन खुर्चीत टेकली न् टेकली लिनेतने विषयाला हात घातला.

'निकोलाशी विषय काढणार म्हणत होतीस तू. पण काहीच बोलली नाहीस ती?'

'त्याचा मूड बरा नव्हता पोरी. मी चांगलं जाणते त्याला. मग काय? उगाच ओरडणार. रागवून त्याने

एकदा नकार दिला की मग त्या नकाराचा होकार करणे महाकठीण.'

तशीच उठून लिनेत स्वयंपाकघरात गेली. कामाला लागली. मनातल्या मनात खूप चरफडली. काही बोलली नसली तरी काम करताना होणारी भांड्यांची आदळ-आपट तिच्या मनातील त्रागा व्यक्त करत होती.

लिनेतच्या मनात आले, 'हे असं किती काळ चालू द्यायचं? तिचे आणि मुकुलचे शरीरसंबंध चालू होते. असे चोरटे संबंध तरी कुठवर चालू ठेवायचे? गावातल्या बहुतांश लोकांना खरं तर त्या दोघांच्या संबंधाबद्दल माहीत झालं होतं. एकदा लग्न झालं, सामाजिक मान्यता मिळाली की लिनेत मुकुलच्या हातात हात गुंफून फिरायला मोकळी होणार होती. खरं तर लिनेत आता आई होण्याचं स्वप्न पाहात होती. पण स्वप्न आणि वास्तव यांच्यात हातमिळवणी तर व्हायला हवी ना?'

अंतर्यामी आणखीन एक भीती चोरपावलांनी तिच्या मनात शिरली होती. एक मन म्हणायचे, 'लग्नानंतर मिळायचं सुख लग्नाआधीच मिळाल्यानं मुकूल तिची फसवणूक तर करणार नाही ना?' दुसरे मन म्हणायचे, 'मुकूलच्या मनात तिला फसवायचं असतं तर एवढा अवधी तरी त्यानं कशाला घेतला असता? कधीच तिची फसवणूक करून तो मोकळा झाला असता. शिवाय तो हिंदू आणि ती ख्रिश्चन. तिच्या आईची संमती असली तरी ती पुरेशी होती का? तिच्या भावाची पण संमती हवी. ते दोघे तिच्या पाठीशी ठाम उभे राहिले तर त्या आंतरजातीय विवाहास समाजाची मान्यता मिळणं सोपं होतं. मुकूलचा तिच्याशी लग्न करायचा विचार फिरण्याआधीच त्यांचा विवाह घडून यायला हवा होता. समाजाचं काय? तो कुंपणावर बसून असतो. दोन्ही बाजूंनी फायदा उपटायला तत्पर असतो.'

आई निमगोरी. विवाहित जीवनात प्रचंड ताणतणाव सहन केलेले. त्यामुळे ऐन पन्नाशीत चेहऱ्यावर सुरकुत्या हजेरी लावून पाहणाऱ्या. बांधा उंच, शिडशिडीत. मानेवर केसांचा मध्यम आकाराचा अंबाडा. घराबाहेर जाताना आई साडी घालायची. काम करायला सोईचं म्हणून ती घरात फ्रॉक घालायची.

चर्चमध्ये बाजारात जाता-येताना आईच्या कानांवर भल्या-बुऱ्या कितीतरी गोष्टी यायच्या. त्यामुळे तिच्या डोक्यात वेगळेच विचार घोळायचे, 'सध्या कुठल्या कुटुंबाला वेळ होता दुसऱ्याच्या भानगडीत नाक खुपसायला. विविध कारणांसाठी एकत्र कुटुंबं फुटलेली. छोटं कुटुंब, सुखी कुटुंब या सूत्राचा अवलंब केल्यानं गोव्याच्या गावातील सुखवस्तू, ऐसपैस कौलारू घरात इन- मीन - तीन ते चार माणसं असायची. ढासळणारी नीतीमूल्यं, विविध कारणांसाठी गोव्यात येणारी परराज्यांतील विविध थरांतील मंडळी, गोव्यांतील महिलांच्या सोन्याच्या दागिन्यांच्या सोसापायी गोव्याकडे आकर्षित झालेले दरोडेखोर, राजकीय नेतेमंडळींच्या हस्तक्षेपामुळं पोलिसांची झालेली उदासीन वृत्ती, भरदिवसा शहाळी तसेच त्या - त्या हंगामात ती - ती फळं उदरभरणासाठी पळवणारे फळचोर. मुलं, मुली, घरचा पुरुष कामावर गेल्यानंतर दिवसभर पुढील दार, मागील दार, घराभोवतालचे परसू यांवर नजर ठेवताना होणारी गृहिणीची दमछाक आणि उरात

सतत एक अनामिक भीती.

घरचा पुरुष दुपारी, रात्री कामावरून घरी परतणारा असला तर भुरटे चोर जरा तरी दबून असायचे. पण तो अर्थार्जनासाठी आखाती देशात किंवा कुटुंबापासून दूरवर राहत असला तर भुरट्या चोरांची भीड चेपायची. घराभोवतालच्या परसातल्या कैक वर्षांच्या जुन्या, जुडशीळ तांब्या - पितळेच्या वस्तू गायब करून गृहिणींच्या तोंडाचा पट्टा चालू करण्यात परप्रांतियांना विशेष सुख मिळायचे.

परदेशात असणारे भाटकार आपल्या जमिनी, घरांना दुरावले. परदेशातच अडकून पडले. नव्या कूळ व मुंडकार कायद्यामुळं स्थावर मालमत्ता त्यांच्या ताब्यात गेलेली. जी काही बंद घरं उरली होती ती उघडून त्यांत तळागाळांतील परप्रांतियांनी मुक्काम ठोकला होता. त्यांना जाब कोण विचारणार? त्यातील बऱ्याच पुरुषवर्गाजवळील धारदार हत्यारें आणि त्यांच्या बायकांच्या तोंडाचा पट्टा यांना कोण तोंड देणार?'

विचारांच्या आवर्तात, मनाच्या दोलायमान अवस्थेत दोघींचे दिवस सरत होते.

बोटीवर काम करणाऱ्या लिनेतच्या वडिलांनी जमवून पाठवलेल्या पैशांतून आईने दक्षिण गोव्यातील कुंकळ्ळी गावात भरपूर जमीन विकत घेतली. जमिनीच्या मध्यभागी चिऱ्यांचे ऐसपैस कौलारू घर आणि घरामागे विहीर बांधून घेतली. पहिल्या पावसात माड, फळ-फूलझाडे तसेच वनौषधींची लागवड केली. पैशांच्या उपलब्धतेनुसार आई टप्प्या-टप्प्याने काम करून घ्यायची.

घराची बाह्य रंगरंगोटी करून काय करायचे? त्याऐवजी आईने घराची जमीन लाल सिमेंटने लिंपून घेतली. स्वयंपाकघराच्या फरशीत भूमिगत मोठ्या बरणीसारखी जागा तिने बांधून घेतली. त्यांत दीड-दोन हजारपर्यंतच्या कैऱ्या, आंबाडे, आवळे वेगवेगळ्या कप्प्यांत, प्रत्येक हंगामात ती खारवून ठेवायची. बरणीच्या तोंडावर एक लाकडी पाट बसवला होता. खारवण्यासाठी सुरूवातीला कच्चा माल विकत घ्यावा लागायचा पण हळूहळू कलमी आंब्यांनी मुक्त हस्तें दान द्यायला सुरूवात केली.

कैऱ्यांचे मिस्कूट, लोणचेसुद्धा आई छान करायची. माहेरच्या एका हिंदू मैत्रिणीने आईला शिकवलेल्या या पोटविद्येचा त्यांना उदरनिर्वाहासाठी भरपूर उपयोग व्हायचा. शिवाय कुक्कुटपालन, फळ-फूल विक्री होतीच.

वडिलांनी प्रयत्न केला असता तर एखादा गृहोद्योग ते सहज करू शकले असते. पण कित्येक वर्षांनी परदेशातल्या कामात कार्यकुशलता आलेली. शिवाय परदेशस्थित व्यक्तीला गोव्यात एक प्रकारची प्रतिष्ठा होती. म्हणून त्यांना स्वदेशातल्या उद्योगात रस नव्हता.

एक दिवस, न सांगता सवरता, अचानक वडील आपला सगळा बाड-बिस्तरा घेऊन दारात उभे. सुरूवातीला सर्वांना हर्षानंद झाला. नंतर वडिलांना झालेल्या नूतन असाध्य रोगाबद्दल समजले तसे सगळे कोलमडून पडले.

वास्तवाचे भान ठेवून आईने स्वतःला आणि मुलांना सावरले. ती सर्वांची उर्जास्रोत झाली.

गावात नव्याने उगवलेल्या फास्ट फूड सेंटरमध्ये आई आपल्या परसबागेतला माल पाठवू लागली. घराभोवतालच्या काळ्या आईने, भूमातेने गृहलक्ष्मीला धनलक्ष्मी बनवले. कुटुंबाला जेवणखाणाची, अन्य सोई सुविधांची भ्रांत पडू दिली नाही.

कोकण रेल्वे गोव्यात आली आणि त्याचबरोबर आला बाळ्ळी-कुंकळ्ळी स्टेशनवरून अन्न, वस्त्र, निवारा या माणसाच्या मूलभूत गरजा भागवण्यासाठी हपापलेल्या, तळागाळांतील परप्रांतियांचा लोंढा. सुरूवातीला एक जोडपे आईच्या घराच्या कुंपणाच्या भिंतीचा आधार घेऊन झोपडी बांधून राहू लागले. स्थानिक तरुणांना शिक्षणामुळे अहंकाराचे वारे बाधले होते. अंगमेहनतीच्या कामांना ते तुच्छ लेखत. बेकार, बेरोजगार राहिले तरी पालक त्यांच्या उदरभरणाची सोय करत. पोटाला चिमटा नव्हता की भविष्याची जाण नव्हती. याचा फायदा तळागाळांतील परप्रांतियांना झाला. अंगमेहनतीची कामे करून त्यांनी गोव्याच्या भूमीत आपले पाय घट्ट रोवले. आईला या जोडप्याचा आधार मिळाला.

अतिश्रमांची कामे. जोडीला मुक्त जीवनशैली. वडिलांची ढासळलेली तब्येत सावरलीच नाही. त्यातच त्यांचा शेवट झाला. या गोष्टीला सर्वांच्या मनाची तयारी होतीच. पण प्रत्यक्ष प्रसंग आल्यावर सगळे गांगरून गेले. पण टीचभर पोटाची खळगी प्रत्येकाला कार्यरत व्हायला उद्युक्त करते. शिवाय झरझर निघून जाणाऱ्या काळाचे औषध दुःखाची तीव्रता कमी करते.

लिनेतचा भाऊ निकोलस. त्याला शिक्षणात अजिबात रस नव्हता. आईला निकोलसच्या भविष्याची चिंता लागून राहिलेली.

'निकोला ऽऽ, मग काय ठरवलंस तू बाळा?'

'कशाचं काय?'

'निकोला, काही शिकायचं म्हणजे तुझ्या अगदी जिवावर येतं हे माहिताय मला. पण काहीतरी काम-धंदा नको का करायला? मिक्सर, टी. व्ही., संगणक यांची दुरुस्ती कामे शिकलास तरी भरपूर कमाई करता येते बाबा.'

'तसलं काही मला जमणार नाही. कशाला माझ्या पाठी लागलीयं?'

'शाळा-कॉलेजात जायचं नसेल तर राहू दे. पण जगाच्या शाळेत माणसाला सतत काही ना काहीतरी शिकावंच लागतं बाबा. पोटाचा प्रश्न आहे तो. नुसतं जन्म देण्यापुरतं आई-वडील होऊन नाही चालत बाळा. शिक्षण देऊन त्यांना आपल्या पायांवर उभं केलं, त्यांना मार्गी लावलं म्हणजे शांती – समाधान लाभते मनाला. असं करूया का?'

आईच्या डोक्यात काय काय चालते ते निकोलासला तिच्या कृतीवरून समजून येई. इतक्या वर्षांच्या

सहवासाचा तो परिणाम होता. आपल्या बाबतीत आईच्या मनात आणखीन कसल्या योजना आहेत जीझस् जाणे! त्याने अनिच्छेनेच विचारले, 'कसं?'

'सुझेतनं घरातल्या घरात शालेय विद्यार्थ्यांसाठी नाश्त्याचं टिफीन पुरवायचं काम घेतलंय. ॲन्ड्र्यूनं घरातल्या घरात बार ॲन्ड रेस्टॉरंट. तसं काही करूया का?'

'ॲन्ड्र्यू – सुझेतची मीच तर प्रमुख मदतनीस. कच्चा माल आणि भांड्याकुंड्यांची खरेदी यासाठी मीच गेले होते त्यांच्याबरोबर. मी करू शकेन तुला मार्गदर्शन. तेच कशाला? रोज स्वयंपाकघरातसुद्धा मदत करीन मी. आईसुद्धा येईल मदतीला.'

'बघ, बघ निकोला. लिनेत एवढं सा़ंगते. तिचं तरी ऐक.'

'निकोला, या घरासमोरच्या मोकळ्या जागेत बारकी टेबलं – खुर्च्या टाकायची. त्यांवर सावली धरायला रंगी – बेरंगी छत्र्या. सेवा अगदी उत्तम द्यायची. एकदा आलेला ग्राहक पुन्हा दहा जणांना घेऊन येईल असे चटपटीत खाद्यपदार्थ द्यायचे. तीच आपली जाहिरात. पर्यटकांशी संपर्क तू साधायचास.'

'बघितलंस निकोला? सगळा आराखडा लिनेतच्या डोक्यात तयार दिसतो.'

'अगं आहे त्याचा पर्यटकांशी संपर्क. तो थोडा वाढवायचा म्हणजे झालं.'

'बघ बाबा, देशी, परदेशी चलन अगदी थेट घरात येईल. शहरातलीच कशाला? गावातली हॉटेलं बघ कशी खोऱ्यानं पैसा ओढताय.'

निकोलस मौनीबाबा बनतो.

'सुरूवात थोडी कठीण असते. पण सतत प्रयत्न केला तर मग हळूहळू सगळं जमतं. सुझेत आणि ॲन्ड्र्यूनं बघ कसा छान जम बसवलाय.'

निकोलसच्या मानगुटीवर, परदेश वास्तव्याचे स्वार झालेले भूत उतरायला तयार नव्हते.

'एकदा परदेशवारीचा अनुभव घेऊन ये. त्याला माझी ना नाही बाळा. पण गोव्यातच स्थायिक हो.'

'तुम्हा स्त्रियांना नाही कळायचं ते. आमच्या पुरुषांच्या दृष्टिकोनांतून पाहायला हवं.'

'निकोलस एवढे बोलल्यावर मग काय बोलणेच खुंटले.

'परदेशात स्वच्छतागृहांची देखभाल, रेल्वे स्टेशनांवर साफसफाई, बेबी सिटींग, ज्येष्ठ नागरिकांसाठी कंपेनियन, पेट्रॉल पंपावर, इमारतींच्या बांधकामावर काम करणं, हॉटेलात डिशवॉशर म्हणून काम करणं, यातून गडगंज संपत्ती मिळत असेल. आपल्या जन्मभूमीत स्वतंत्र उद्योगासाठी निकोलाच्या वडिलांनी आवश्यक माया मागं ठेवली होती. घराचा भक्कम आधार होता. ही सगळी मालमत्ता सांभाळणं आणि नंतर

त्यात नित्य भर घालणं हे पुत्रकर्तव्य' असे आईचे मत होते.

'घरातल्या पुरुषाचा स्त्री-वर्गाला किती आधार वाटतो ते निकोलसला कधी आणि कसं कळणार? असे स्थानिक तरूण परदेशात वास्तव्य करून राहिले तर इथं राहणाऱ्या त्यांच्या पत्नी आणि मुलांबाळांच्या शारीरिक, मानसिक कुचंबणेचे काय? त्यांच्या जीवित तसेच स्थावर मालमत्ता रक्षणाचे काय? तसे पाहिल्यास आता पाच-सहाच्या गटाने येणाऱ्या दरोडेखोरांपुढे एकट्या पुरुषाचा निभाव तो काय लागणार? पण स्त्री-जातीला तेवढाच धीर, तेवढाच आधार रात्रीच्या निवांत झोपेसाठी पुरेसा असतो.'

आई त्या सगळ्या दाहक अनुभवांतून गेली होती म्हणून तिने निकोलसला परोपरीने विनविले. पण तो आपल्या निश्चयापासून ढळला नाही. तेव्हा मात्र आपण मुलाच्या अंतरांत स्वदेशाभिमान फुलवण्यात कमी पडलो याची दुःखद जाणीव आईला झाली. अशा परिस्थितीत तरुण-तरुणींचे आंतरजातीय, आंतरराष्ट्रीय विवाह जुळून आले तर समाजाने तरी त्यांना का म्हणून दोष द्यायचा? का म्हणून टीका करायची? छळणूक का करायची? वाळीत का टाकायचे? परिस्थिती बदलण्याएवढे जर आपण सक्षम नसू तर त्यावर काही बोलण्या-करण्याचा आपल्याला काय अधिकार?

अंतर्यामी उठणाऱ्या या खळबळजनक विचारांमुळे आईने मुकूलच्या त्यांच्या घरी येण्याला आक्षेप घेतला नव्हता. मूक पाठिंबाच दिला होता. मजबूत हाडपेराच्या लिनेतपुढे मुकूल काहीसा कृश असल्याने उंच, नाजूक, पोरगेलासा दिसत होता. पण विवाहसौख्यानंतर सगळे सुधारतात अंगापिंडाने. मग वाढते वजन आटोक्यात आणू म्हणता आटोक्यात येत नाही. मुकूल - लिनेतचे फुलणारे प्रेम, बहरणारे तारुण्य पाहण्यात आई कुठेतरी समाधान पावत होती, तृप्त होत होती. मुकूल एक दिवस जरी नजरेआड आला तरी आई अस्वस्थ व्हायची. मुकूलसुद्धा आईची प्रेमळपणे विचारपूस करी. त्यांची भावनिक जपणूक करी. निकोलस परदेशात स्थायिक झालाच तर मुकूलला घरजावई करायचे आईचे स्वप्न होते. हे सगळे निकोलसच्या कानांवर घालण्यासाठी योग्य वेळेच्या संधीची ती वाट पाहत होती.

मुकूल सगळ्यापासून काहीसा अलिप्त म्हणून बरे होते. आपले निर्णय तो आपण स्वतः घेऊन मोकळा होई. आई-वडील काय म्हणतील? समाज काय म्हणेल? नातेवाईक वाळीत टाकतील का? अशा गोष्टी त्याच्या खिजगणतीतही नव्हत्या. लिनेत त्याला आवडली. तिही त्याच्यावर फिदा झाली. तन-मनाने ते केव्हाच एकमेकांचे झाले. नोकरीच्या बाबतीतही तेच. बाकीच्यांना नोकरी मिळत नव्हती. पण मुकूलने अगदी मदतनीस म्हणून सुरूवात केली. आता बांधकाम व्यवसायात तो चांगला स्थिरावला होता. चांगली जाण आली होती त्याला. खूप वाव होता त्याल पुढे यायला.

कितीतरी प्रश्न उग्र बनून त्यांच्या जीवनाला ग्रासू पाहत होते. आजवर नुसत्या ऐकलेल्या लोकसंख्यासुराच्या उच्छादाचे कटू अनुभव हळूहळू आईला येऊ लागले. परसदाराच्या कुंपणालगत झोपड्या उगवू लागल्या. सोई-सुविधाअभावी गलिच्छ जीवन जगणाऱ्या माणसांची संख्या वाढत शें-पाऊणशेंवर गेली. ही मंडळी

परसात काहीच शिल्लक ठेवत नव्हती. येणारे फळ पक्व होण्यापूर्वीच त्यांच्या उदरात गडप होईल. कळ्या उमलण्याआधीच खुडल्या जायच्या. अंडी, कोंबड्यांची संख्या हळूहळू कमी होत शून्यावर आली. तळागाळातल्या परप्रांतियांनी बहरलेल्या परसबागेचे वैराण वाळवंट केले. झाडांच्या वाळलेल्या फांद्या – काटक्यासुद्धा त्यांच्या तावडीतून सुटल्या नाहीत. आईच्या घराभोवतीच्या पक्क्या कुंपणाचे चिरे आता हळूहळू हलू लागले. एकेक चिरा जागेवरून हलून ढासळू लागला. सुरूवातीला कामासाठी मदतनीस म्हणून आईला त्यांचा आधार वाटत होता. तो आधार आता महागात पडणार अशी चिन्हे दिसू लागली.

अबू-धाबीहून येऊन गेल्याला निकोलसला महिना होत आला. आता वर्ष, दोन वर्षेतरी तो परतणार नव्हता. त्याच्या संमतीसाठी न थांबता रजिस्टर्ड लग्न उरकून घ्यावे अशा विचारात आई होती.

निकोलस परदेशी असला तरी विविध संपर्क माध्यमातून त्याच्या कानांवर कितीतरी गोष्टी येत होत्या, त्या अर्थातच त्याच्या मित्र-मैत्रिणींकडून. आपल्या गोव्याच्या वास्तव्यात भलभलते विषय काढून घरचे वातावरण गढूळ करायचा प्रयत्न त्याने केला नव्हता. काढलाच कुणी तो विषय तर तो आपला अभिप्राय देणार होता.

मुकूल तसा एक-दोनदां भेटला होता निकोलसला. पण घरात, त्याच्या उपस्थितीत तो कधीच आला नव्हता. कदाचित त्याला तसे धाडस झाले नसावे. पण आता तर खूपच पुढची पायरी गाठली होती त्या दोघांनी. अर्थात ही त्याच्या कानांवर आलेली गोष्ट होती.

क्षणात त्याला वाटायचे, 'कसा काय विश्वास ठेवायचा या मंडळीवर? आपलं परदेशातील वास्तव्य आणि गावातील आपली सुस्थिती पाहून जळत नसतील ना ते? आपला मत्सर, हेवा तर वाटत नसेल त्यांना?' न राहवून त्याने तसे म्हटलेसुद्धा.

'अरे ऽऽ, मग येऊनच बघ ना स्वतःच्या डोळ्यांनी? तू कष्ट करतोस त्याचा मोबदला तुला मिळतो. मला तुझा हेवा वाटण्याचं काय कारण?'

असे सरळ आव्हान दिल्यावर त्याचे डोके गरम झाले.

'अरे परवाच येऊन गेलास ना तू? आता अगदी बिनधास्त चाललंय. येच तू. बेसावध असलेल्यांना पकड, अगदी रेड हॅंडेड.'

वरून दाखवले नाही तरी आईच्या अंतर्यामी आपल्या दोन्ही लेकरांच्या भवितव्याबद्दल चिंता होती. दिवस कामात सरायचा. पण रात्र झाली, अंथरूणाला पाठ टेकली की निद्रादेवी रुसून बसायची. मनात यायचे, 'पुरुष रक्षक आहे. पण त्याचा भक्षक व्हायला वेळ लागत नाही. अर्थात, सगळेच पुरुष भक्षक म्हणणे वेडेपणाचं. आपण घराबाहेर जाताना दाराला कड्या-कुलूपे नाही का लावून जात? चोर-दरोडेखोर असली कुलूपे एका मिनिटाला तीन अशा सरासरीत उघडतात. म्हणून आपण घरदार कड्या-कुलूपांविना उघडीच

सोडून जातो का? सगळीच माणसं चोर-दरोडेखोर नसतात. असतो तो मनाचा क्षणिक कमकुवतपणा.' विचारांनी अगदी श्रांत होऊन पडल्यावर पहाटे पहाटे आईचा डोळा लागायचा.

मुकूल आणि लिनेत दोघे आपल्या भविष्याबाबतची आपापली स्वप्ने एकमेकांना रंगवून सांगत. चढत्या रात्रीच्या एकांताची नशा त्यांच्या शृंगाराला चढायची. परिणामी पहाटे दोघे अगदी साखरझोपेत.

दारावरची घंटा शांत वातावरणात कर्कश वाजली तशी आई दचकून जागी झाली.

'कोण बरं आलं असावं इतक्या पहाटे? भास तर नाही ना झाला?' असे वाटत असतानाच बेल पुन्हा वाजली. आई धडपडून उठली. दाराकडे गेली.

'कोण?'

'मी निकोला.'

'निकोला, अगदी पहाटे पहाटेच. असं काय घडलं बाबा, तुला यावं लागलं अचानक?' म्हणत आईने दार उघडले.

एवढ्या पहाटे कोण आले असावे ते पाहायला लिनेत आणि तिच्या मागोमाग मुकूल बाहेर आला. आई आणि लिनेतला पाहून निकोला तसा शांत होता. पण लिनेतच्या मागून येणाऱ्या मुकूलला पाहून त्याचा स्वतःवरचा ताबा गेला. एका प्रचंड वादळागत उंचापुरा, धष्टपुष्ट निकोलस घरात घुसला.

'मुकूल तू इथं? काय करतोस तू इथं?'

निकोलसचे डोळे आग ओकीत होतो. चेहरा अगदी अक्राळ विक्राळ दिसत होता. त्याचा तो अवतार पाहून आई आणि लिनेतच्या अंगाला कांपरें भरले. मुकूल घरात आहे हे आईच्या ध्यानातच नव्हते.

'हे बघ निकोला...'

'तेच बघायला आलोय रे. तुझ्या घरात असायला हवास तू या वेळी. माझ्या घरात कसा?' निकोलाने मुकूलला धक्का देत म्हटलं.

'निकोला, पोरा, तू शांत हो कसा'

'म्हणजे तुझ्याच संमतीनं चाललंय म्हणायचं हे आई.'

'बाळा, निकोला..'

'निकोला, प्लीज सोडून दे मुकूलला. पाया पडते तुझ्या.'

'लिनेत, काही नको त्याच्या पाया पडायला. आम्ही सज्ञान आहोत. कायदेशीर विवाह करू शकतो आम्ही. तू काय करणार?'

झाले. मुकूलने आगीत तेल ओतण्याचेच काम केले. सारासार विचार करणे हा निकोलसचा पिंड नव्हता. कानपोकळा निकोलस आता अडकला.

'मी काय करणार?'

'हो. काय करू शकतोस तू? बघू तरी.'

'बघायचंय तुला मी काय करू शकतो ते. मग हे घे.'

कंबरेला खोचलेला लांबलचक, लखलखता सुरा निकालसने कधी उपसला ते कुणाला कळलेच नाही. कुणालाच, स्वतःला सावरण्याची किंवा प्रतिकाराची संधी अजिबात मिळाली नाही. निकोलसने मुकूलवर सपासप, वेड्यासारखे वार केले. क्षणात मधुमीलनाच्या शांत, सुंदर रात्रीचा शेवट भीषण, भयाण अशा पहाटेत झाला. वातावरण किंकाळ्यांनी दूषित झाले. लिनेतच्या मांडीवर मुकूलने मान टाकली.

गावातल्या असंतुष्ट स्वकियांनी, अबू-धाबीत असलेल्या निकोलाच्या कानात फोनद्वारे, सतत वीष ओतायचे काम केले होते. पण ते आईला कसे कळणार? निकोलसने अविचाराने उचललेल्या पावलामुळे आईला लिनेतचे भवितव्य अंधकारमय दिसत होते. आईच्या कमकुवत झालेल्या हृदयाने दगा दिला. ते तरी बिचारे एकामागून एक किती आघात सहन करणार?

निकोलसला पोलिसांनी अटक केली. लिनेतला खोदून खोदून प्रश्न विचारले. लिनेत अबोल झाली होती.

लिनेत गतस्मृतीतून भानावर आली. आजच्या परिस्थितीत, आजच्या या क्षणाला काय योग्य आहे? इतरांनी आपलं काम नव्हतं केलं बरोबर म्हणून आपणही जाऊन बसायचं का त्याच रांगेत? छे ! छे! आजपर्यंत आपलं काम प्रेमाने, प्रामाणिकपणे, निष्ठेने करत आले. तीच निष्ठा ठेवायची समाजाप्रती. गुन्हेगारांना शिक्षेचा धाक असायलाच हवा. काळजात फुटून येणाऱ्या ममतेच्या धुमाऱ्यांचा कठोर कर्तव्याचा बांध हा घालायलाच हवा. तिने पोलिसांना पूर्ण सहकार्य केलं. निकोलसला जन्मठेपेची शिक्षा झाली.

घरात एक तर परसदारी दुसरे नाट्य घडत होते. कुंपणाचे एका भागाचे चिरे पूर्णपणे निखळवून परसदारात राजरोस यायला भला-थोरला, रुंद मार्ग तयार केला गेला होता. काही झोपड्या परसात उगवल्या होत्या. झोपड्यांची भीड चेपली होती. त्या निर्ढावल्या होत्या.

रात्री दारावर थाप पडली. विविध ताण - तणावांमुळे ग्लानी आलेली लिनेत दचकून जागी झाली. मुकूल आला असे वाटून ती आनंदली. दुसऱ्याच क्षणी तिला वास्तवाचे भान आले. परसात तिच्या जमिनीवर अतिक्रमण चालू होते. घराच्या प्रवेशद्वारातून लांडगे तिच्या चारित्र्यावर घाला घालू पाहत होते. गलितगात्र, एकाकी लिनेतच्या शरीरात कुणालाच थोपविण्याचे सामर्थ्य नव्हते.

●●●

# स्त्री मनाचे लोकदैवत श्री गणेश

– पौर्णिमा राजेन्द्र केरकर

लोकगीते आणि धार्मिकता यांचा संबंध पूर्वापार चालत आलेला आहे. लोकसाहित्यातील लोकगीतांचे दालन तर अतिशय प्रगल्भ, श्रीमंत असेच आहे. धर्म आणि लौकिक जीवन विषयक पूजा सणसमारंभ, व्रतवैकल्ये या विषयीची आत्मीयता, पारंपरिकता सामाजिकता त्याच्याशी निगडीत असलेल्या लोकगीतातून आढळत आलेली आहे. लोकदैवतविषयक स्त्रीगीतात धार्मिकता महत्त्वपूर्ण ठरलेली आहे. म्हणूनच पंढरीचा पांडुरंग, गोकुळातला कृष्ण, देवाधिदेव गणेश स्त्रीमनाला स्पर्शून गेले. त्यातूनच सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक, सांसारिक गरजांतून ही लोकदैवते लोकगीतांची प्रेरणास्थाने बनली. अनुभवातून जीवन जाणिवांकडे बघताना मनाने अनुभवाने – ती आपल्या लाडक्या लोकदैवतांशी एकरूप होतात. 'गणेश' हे दैवत तर ग्रामजीवनाचे लाडके दैवत, तिचे जिवाभावाचे – श्रद्धेशी, विचारांशी, भावनेशी एकरूप झालेले. म्हणूनच चवथीच्या दिवसांची ती आतुरतेने वाट पाहात असलेली फुगडी नृत्यातून स्वतःला अभिव्यक्त करण्यासाठीच!

'फुगडी' या लोकनृत्याला गोमंतकीय जनमानसात अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे. प्रापंचिक समस्यांतून संघर्षातून ताणतणांवातून विसावा म्हणूनही या नृत्याचे वेगळेपण नजरेत भरते. गड्या (सख्या) सहित फूऽऽफूऽऽ करीत गोलाकार नृत्य करण्याचा हा प्रकार धरतीशीच निगडीत आहे. भाद्रपद महिन्यात तर तिच्यासाठी वेळ तसा रिकामाच असतो. कष्टाची कामे संपलेली असतात. ऊन पाऊस यांचा खेळ चालूच असतो. वातावरणातही आल्हाददायकता असते अशा वेळी साहजिकच गणेशाच्या आगमनाने चित्तवृत्ती पुलकित होतात. ती आतुरतेने मग चतुर्थीची वाट पाहाते -

चवथी बाई तू कधी गे येशी
पावसपडे नदीवर येईन भागीयात

गणपतीचा आशिर्वाद तर तिच्यासाठी आश्वासक, प्रेरणादायी. सर्वसामान्यांचाच तो देव. अग्रमानाचा तरीही साधाभोळा, भक्ताना पावणारा. भाद्रपद महिन्यात येणाऱ्या चवथीबाई विषयी अंतःकरणातील उत्कट भाव अभिव्यक्त होतो. चतुर्थीचा सण हा उत्साहाचा, चैतन्याचा, हिरवाईचा साज घेऊन येणारा सण. या दिवसात तर फुगडीला बहारच आलेली असते. बालगोपाळामध्येही एक उत्साह असतो. गणेशाच्या जन्माच्या वेळच्या आख्यायिका मग हळूवारतेने गीतांच्या माध्यमातून उलगडवून दाखविण्यात येतात. गीतांची लय, पावलांची लयबद्धता, पदन्यास, टाळ्यांचा आवाज काकणांची किणकीण या साऱ्यातून वातावरणात मंत्रगूढता येते. पावले थिरकतात आणि लोकनृत्याचा एक मनोहारी आविष्कार सादर होतो. शारीरिक, मानसिक कष्टाचाही त्यावेळी विसर पडतो. गणेश जन्माच्या आख्यायिके विषयी तर सर्वांना अपार उत्सूकताच. पार्वतीने अंगीच्या मळाचा केलेला बाळ चमत्कृतीपूर्ण जरी वाटला तरी स्त्रीमन त्याच्याशी भावभक्तीने एकरूप होते.

म्हादेव तपा बैसला
चालता बोलता झाली बारा वर्सा
पार्वतीन फोडीले पाच नारळ
काडीला अमृतरस
अमृत काडूनी अंगी लाविले
आंगीची काडीली मळ का माती
चक्री घालूनी बाळ सा केला
बाळाला सजीवंत केला-

पार्वती ही पर्वताची कन्या. तिच्या अंगीचा 'मळ' म्हणजे माती आणि मातीचाच गणपती. असा अन्वयार्थ आपण लावला तर गणेशपूजा ही मातीचीच पूजा म्हणजेच निसर्गपूजा. समाजमन स्त्रीजन्म नाखुषीनेच स्विकारते. असे असले तरी 'ती' दिसामासाने मोठी मोठी होत जातेच. बालसुलभ कपड्यातून ती वयात येते. अंगणात झिम्माफुगडी खेळत खेळत मोठी होते आणि मग गीतातूनच सख्यांना बोलावत चतुर्थीचा

आनंद घेते -

चवथीचा दिवस आला ग बाई
चवथीचा दिवस आला ग बाई
येया बायानो चला सयानो
चवथीचा दिवस आला
पार्वती मातेक सोबीत सोबीत
सुंदर पुत्र झाला ग चवथीचा दिवस आला ग

ग्रामजीवनातील लोकपरंपरेत अलिकडील काही वर्षात या चवथीच्या सणाला मोठ्या प्रमाणात महत्त्व प्राप्त झालेले आहे. गवर गणपतीचा उत्सव एकत्रीत साजरा केला जातो. भाद्रपद महिना हा सुफली करणाचा महिना, स्त्रीत्वाची, शक्तीची पूजा केली जाते. निसर्ग हा जीवनाचा महत्वपूर्ण भाग निसर्गातील गहनगूढ संकल्पना माहिती नसल्याकारणाने निसर्गातील घटकांचा नायनाट होता कामा नये या संकल्पनेतूनही देवांचा जन्म झाला असावा. गणपती हा तर गणांचा अधिपती आणि त्याच्या जोडीनेच होणारी गौराईची आराधना ही तर स्त्रीसृजनशक्तीचीच पूजा! स्त्रीचे संपूर्ण जीवनच मुळी सासर - माहेराला समर्पीत आहे. तिचे परमेश्वराकडे असलेले मागणे ही तिच्या संसारासाठीच असते. गौराई ही मग तिला स्वतःची सखीच वाटते. ती म्हणते -

श्री गणेशा रे महादेवा
गवर जाता आज माहेरा
जाता तशी तिला जावू दे
तांबडी साडी तिला लेवू दे

गणपती हा स्त्रीमनाचा लाडका देव मागणे मागायचे हे त्याच्यापाशीच, आशीर्वाद घ्यायचा तो ही त्याचाच. दुःख हलकं करायचे त्याच्याकडेच. तो आहेच तसा म्हणून 'आमचो गणोबा मोकाशी, भुलोन व्हरता लोकाशी. जनमानसात वेड लावणारे असेच हे लोभसवाणे दैवत तिच्या हृदयीचे होते. चवथीच्या सणासाठी हातात बांगड्या भरण्यासाठी ती कासारमामाकडे जाते, पण तो तिचा घात करतो तेही दुःख ती गीतातून व्यक्त करते - गणपती बाप्पा बघ माझो हात, कासारमामान केलो माझो घात' अशी तक्रार गणोबाकडे केली जाते. त्याला मानवी भावजीवनाच्या पातळीवरच आणले जाते. चवथ हा सणांचा राजा आणि गणेश हाच तर राजेशाही पाहुणा, त्याचे घरी आगमन झाल्यावर

'चवथीच्या सणाचा ग'
बसला पाहूणा
घे बाप्पा म्हणी पाणी
तू हातापायी

कधी कधी तर त्याच्या रुपाने ती एवढी हरखून जाते की तिला कळतही नाही की त्याच्याकडे काय मागावे 'गणपती देवा पडते मी पाया, काय मागणे मागू' हा संभ्रम आहे. पण तरीही ती जे काही मागते ती तिच्या अहेवपणासाठीच. तिचा नवरा, मुले, संसार हेच तर तिचे सर्वस्व –

गणपती देवा करीन तुझी सेवा
नवस वाहीन रे
पाच फळांनी पाच फुलांनी
दुर्वा वाहीन रे
कपाळाचा कुंकू दे जन्मभर
आणि कायी मागेन रे ऽऽ

अशी आर्त हाक देते. ती पतीपरमेश्वरासाठीच!

पारंपारिक दवलेमाणीचा वाजप त्याच्यासाठी तयार ठेवते. फुगडीला संगीत नसतेच त्यातील पदन्यास, काकणांची किणकिण, लयबद्धता टाळ्यांचा आवाज हेच तर संगीत.

गणेशजन्माच्या अनेक कथा लोकसाहित्यात आढळतील. गणेशाच्या जोडीने पुजली जाणारी गौराई ही तर स्त्रीशक्तीचेच प्रतीक. भक्ताच्या अडचणीला धावून जाणे देवाचे ब्रीद देव आणि भक्त यांच्या प्रेमाची निदर्शक म्हणजेच ही फुगडीगीते. देवता विषयींच्या गीतातही स्त्री–लोकमानस नातेसंबंधातून पाहाते. लोकमानस देवाला मानवी पातळीवर स्वीकारते. गणोबा – गौराई ला मग हे लोकमानस खेळायला बोलावते.

गणोबा आला गवर का ग नाही
आली आली गौराय इथेच होती
सुपारी च्या बागेत खेळत होती
सयांच्या ओट्या भरत होती.

लोकमानसाने आपल्या आवडीच्या देवदेवतांशी मांडलेला हा खेळ भावभक्तीचा आहे. आपल्या लाडक्या दैवताशी भक्तीचा मळा फुलविताना ते एकरूप होते. तहानभूक विसरते. हे प्रेम भक्ती मुक्तीच्या प्रेमापेक्षा लौकिक पातळीवरच अवतरते. त्याच्याशी एकात्म होते – चवथीचा सण, म्हणूनच स्त्री मनाला अभिव्यक्त करणारा आहे. सगुण भक्तीची ही उपासना आहे. स्त्री मनाची श्रद्धा आणि भक्ती जशी इथे व्यक्त होते तशीच देवाशी केलेली सलगीही दिसते.



# पावसातला मी नि माझ्यातला पाऊस

– विष्णू सुर्या वाघ

अघनाशिनी अर्थात झुवारी नदीच्या काठावर वसलेल्या डोंगरी गावातील आमच्या शेतात मी मेरेवर उभा आहे... हातात काठी... खांद्यावर कांबळ... डोईवर प्लॅस्टीकची पावसाळी हॅट... मेरेवर उभा राहून मी सभोवार पाहतोय... लांबचलांब पसरलेल्या खाजन जमिनीच्या पट्ट्यात कितीतरी लोक खंडणी-लिंपणीच्या कामात गुंतलेत. थंड बोचरा वारा आपल्याच मस्तीत रोरांवत चाललाय. वाऱ्यासोबत शेतातली ओली, चिखलाळ धूळही भुरभुरू उडत्येय. वरवर जाणाऱ्या या धुळीचेंच जणू काही ढग होतायत. नि आभाळात संथपणे घिरट्या घालणाऱ्या घारींप्रमाणेच शेतावर दाटून येतात. मग सभोवार पसरते काळ्या घनांतून झिरपणाऱ्या कृष्णवर्णी उजेडाची काजळ माया. पाहता पाहता भोवतालचे सारे विश्वच काळेभोर झाल्यासारखे वाटते. वाटते, की हे आभाळ आता आतल्याआत जड होऊन आपणावर कोसळणार... आपले सबंध शेत या गगनप्रपातात बुडून जाणार. बालसुलभ भयाच्या जाणिवेची ही तार तुटण्याच्या बेतात येईपर्यंत ताणली जात असतानाच डोईवरच्या काळ्या नभात लख्कन् वीज लकाकते... शेतात काम करणाऱ्या मानायांची 'जोगूल पडलें रे ऽऽऽ' ही आरोळी ऐकू येईपर्यंत कानठळ्यां बसणारां 'कडकडकडकड घडाऽऽम्' असा आवाज नि पाठोपाठ सरसर करीत धरतीवर धाव घेणारे पावसाचे टपोरे थेंब...

'येयलो रे येयलो ऽऽ पावस येयलोऽऽ' आनंदानं आरडत-ओरडत शेतातल्या बाया वा बाप्पे हातांची ओंजळ करून पावसाचे पहिले थेंब झेलतात.. पाण्यानं ओलावलेले तळहात कृतार्थपणे गालावरून ओढतात नि 'शेवटी एकदाची केली कृपा' अशा कृतार्थभावानें आभाळाकडे बघतात.

बालपणी आईसोबत शेतात जाताना अनुभवलेलें हे पावसाचं रूप आजही तसंच आहे. इतकी वर्षं उलटली तरी पाऊस अजून झडतोच पाऊस. आमच्या कोंकणी भाषेत सांगायचं तर 'उगडासांचा' पाऊस!

पुरुषसूक्ताची सुरूवात 'सहस्रशीर्षा सहस्रपुरुषा' अशा शब्दांनी होते. उद्या कुणी पर्जन्यसूक्त लिहायचं ठरवलं तर त्याचा प्रारंभ 'सहस्रशीर्षा सहस्रवर्षा' असाच करावा लागेल. कारण 'पाऊस' या एका नावानं ओळखल्या जाणाऱ्या निसर्गाच्या सृजनाची रुपं प्रत्यक्षात सहस्राहून अधिक आहेत. गोव्यासारख्या प्रतिवर्षी २०० इंचांच्या जवळपास जलवृष्टी होणाऱ्या प्रदेशात तर पांवसाचा हा बहुरुपी खेळ प्रकर्षानं नजरेत भरतो. कधी हळुवार तर कधी रांगडा, कधी खेळकर तर कधी दांडगा, कधी प्रेमळ, कधी रागीट, कधी बुजरा तर कधी धीट, कधी शांत, कधी धुसमुसळा, कधी संयमी, कधी उतावळा, कधी तुफानी तर कधी दमलेला नि कधी मस्तीखोर तर कधी झिंगलेला... पावसाची अशी कितीतरी चित्रं मनाच्या कॅनवासवर रंगवून हृदयाच्या कप्प्यात मी जपून ठेवली आहेत. ही पाऊसझड माझ्या आत, खूप खोलवर चालूच आहे. ती कधी थांबलेली नाही. बहुधा त्यामुळेच राजकारणासारख्या रुक्ष क्षेत्रात वावरत असतानाही मी आतून खूप ओला आहे.

**आवाजाचे झाड**

संथपणे एका लयींत कोसळणाऱ्या, नद्या-नाले- ओहोळांला गुदमरवून टाकणाऱ्या, न कंटाळता बरसत राहणाऱ्या पावसात कान टवकारून ऐकण्याचा प्रयत्न तुम्ही कधी केला आहे? नसेल तर मुद्दाम करून बघा. घरच्या चौकीवर बसल्या बसल्या डोईवरच्या केसांतून आजीचा हात फिरत असताना संधिकाली कोसळणाऱ्या पावसात मला काहीसे विचित्र भास व्हायचे. त्या तशा पावसात कुणीच काही बोलायचं नाही. गोठ्यातली गुरंही हंबरणं विसरलेली असायची. रपरप पडणाऱ्या त्या पावसात मात्र मला एक आवाजाचं झाड दिसायचं... दिसायचं की ऐकू यायचं? 'ऐकू यायचं'च बरोबर आहे. ते आवाजाचं झाड नक्की कसं होतं ते त्यावेळी जाणवलं नाही.

पण मोठा झाल्यावर तसाच पाऊस एकदा मनात पडला नि ही कविता जन्माला आली.

दिशादिशांतून येती उले
गगनाचे गं दार खुले
मौनाची ही झडवीत पाने
आवाजाचे झाड फुले!

